“कौशिक व्याख्यानमाला”—४

प्रकाशन दुसरें

# ऋग्वेदांतील भक्तिमार्ग

हरि दामोदर वेलणकर

माजी संस्कृताचे प्राध्यापक, विल्सन कॉलेज, व
जॉइंट डायरेक्टर, भारतीय विद्या भवन, मुंबई नं. ७

शिक्षण-प्रसारक-मंडळी, पुणें २

१९५२

दीड रुपया

# निवेदन

आमच्या **शिक्षण-प्रसारक-मंडळीच्या** द्वारें जी कौशिक-व्याख्यान-मालेची अलीकडे प्रतिवर्षी होत आलेली योजना सर्वांस आतां माहीत झालेली आहे, या योजनेचे नियम सोबत दिलेच आहेत.

या ग्रंथांत छापलेलीं व्याख्यानें हीं या मालेंतील चौथी माळ होय. पहिले माळी प्रा. रामभाऊ रानडे, दुसरे डॉ. रा. न. दांडेकर, तिसरे प्रा. न. र. फाटक आणि चौथे प्रा. ह. दा. वेलणकर. यांपैकीं रानडे व फाटक हे ज्ञानेश्वरप्रभृती देशी साधुसंतांविषयीं आणि दांडेकर वेलणकर हे वैदिक वाङ्मयाविषयीं बोलले. रानडे आणि फाटक यांचीं व्याख्यानें कांहीं स्वतंत्र रीत्या प्रसिद्ध झालीं आहेत व इतर होत आहेत. डॉ. दांडेकर यांचीं व्याख्यानें आमच्या योजनेप्रमाणें शिक्षणप्रसारक मंडळीकडूनच प्रसिद्ध करण्यांत आलीं आहेत. त्यानंतर वैदिक विषयावरील प्रा. हरिभाऊ वेलणकर यांचें पुस्तक प्रकाशित करण्याचा योग येत आहे.

हरिभाऊंचा विषय "**ऋग्वेदांतील भक्तिमार्ग**" असा होता. त्यावर त्यांनीं तीन व्याख्यानें दिलीं. तीं अत्यंत रसाळ अशीं उतरलीं आहेत यांत शंका नाहीं.

आमच्या कौशिक मालेंत आलटून पालटून वेद आणि देशी कवी असे विषय असतात. वेदांचा विषय रुक्ष वाटणें स्वाभाविक आहे, आणि देशी साधुकवींच्या रसाळ वाणीचा प्रवाह सर्व भक्तिभावानें भरलेला आहे. योगायोग असा कीं, हरिभाऊंचा विषय या दोन प्रवाहांचा संगम साधणारा आहे. वेदांची गंगा आणि भक्तांची यमुना दोघी हरिभाऊंनीं व्याख्यानांत एकत्र आणल्या आहेत.

ऋग्वेदांतील इंद्रसूक्तांचें मंथन करून आपल्या इकडे विकसित झालेल्या भक्तिमार्गाचीं बीजें तेथें कशीं आढळून येतात तें प्रा. वेलणकर यांनीं कुशल युक्तिवादानें या व्याख्यानांतून विशद केलें आहे. कित्येक आधुनिक वेद-विवेचकांनीं वरुणसूक्तांतच भक्तीचें निदर्शन होतें असें प्रतिपादिलें आहे.

परंतु वरुणसूक्तांतील हें भक्तीचें स्वरूप ख्रिस्ती तोंडावळ्याचें आहे. आमच्या भारतीय परंपरेशीं सुसंबद्ध दिसणारें भक्तीचें स्वरूप इंद्रसूक्तांतच आढळतें असें आपले प्रस्तुतचे विद्वान व्याख्याते वेलणकर यांचें प्रतिपादन आहे.

वेदाच्या अभ्यासकांस हें वेलणकर यांचें प्रतिपादन मार्गदर्शक, उद्बोधक आणि विचारणीय वाटेल यांत आम्हांस शंका नाहीं.

या व्याख्यानांमुळें कौशिक व्याख्यानमालेचा हेतु उत्तम प्रकारें सिद्धीस गेला आहे असें म्हणावयास चिंता नाहीं, तीं व्याख्यानें लिहून देऊन त्यांच्या प्रकाशनाचें कार्य त्वरित सिद्धीस नेण्यासहि वेलणकर यांनीं साहाय्य केलें याबद्दल त्यांस मंडळीतर्फे धन्यवाद देणें हें आमचें कर्तव्यच आहे.

या प्रकाशनानें उच्च मराठी वाङ्मयांत चांगली भर निःसंशय पडली आहे आणि वेदविचाराला या प्रकाशनानें पुष्कळ साहाय्य होईल असा आम्हांस भरंवसा वाटतो. तद्वतच भक्तीचीं बीजें वेदापर्यंत या व्याख्यान-मालेंत एका अभिनव पद्धतीनें पोंचविलीं असल्यानें भक्तिमार्गी मंडळीहि या प्रकाशनाचा उत्सुकतेनें आदर करतील अशी अपेक्षा आहे.

प्रा. ह. दा. वेलणकर यांचीं हीं व्याख्यानें शिक्षण-प्रसारक-मंडळीच्या देवी रमाबाई सभागृहांत झालीं. व्याख्यानमालेचें उद्घाटन सुप्रसिद्ध गजेन्द्रगडकर घराण्यांतील विद्वान् न्यायमूर्ति प्रल्हादाचार्य गजेन्द्रगडकर ( मुंबईचें वरिष्ठ न्यायालय ) यांनीं दिनांक २-६-१९५२ रोजीं सकाळीं केलें. व्याख्यानें क्रमानें दिनांक २, ३, व ४ तारखांस झालीं. अनेक विद्वान व प्रतिष्ठित श्रोते या प्रसंगीं उपस्थित होते. न्या. गजेन्द्रगडकर, प्रा. वेलणकर आणि श्रोते मंडळी या सर्वांच्या सहकार्याबद्दल आम्ही शिक्षण-प्रसारक-मंडळी करवीं त्यांस प्रेमपूर्वक धन्यवाद देतों आणि असेंच सहकार्य उत्तरोत्तर मिळो अशी कामना प्रकट करतों.

मार्गशीर्ष शु. ९, १८७४
पुणें २,
दिनांक २५-११-५२

दत्तो वामन पोतदार
अध्यक्ष
नियामक-मंडळ
शिक्षण-प्रसारक-मंडळी, पुणें

## शिक्षण-प्रसारक-मंडळी, पुणें

# कौशिक व्याख्यानमाला

## योजना

(अ) या निधीच्या वार्षिक उत्पन्नांतून (१) ज्ञानदेव किंवा (२) वेद-संस्कृति या दोन विषयांपैकीं एका विषयावर मंडळीच्या नियामक मंडळानें विख्यात विद्वानांना पाचारण करून प्रतिवर्षीं एक व्याख्यानमाला गुंफावी.

(आ) कमींत कमी तीन, अधिकांत अधिक पांच व्याख्यानें व्याख्यात्यानें द्यावींत.

(ई) व्याख्यानें मराठी किंवा इंग्रजी भाषेंत द्यावयाचीं आहेत. तथापि त्यांचें लिखित मराठींतच देण्याविषयीं नियामक मंडळ व्याख्यात्याला बंधन घालूं इच्छील तर त्यास तसें करितां येईल.

(उ) हीं व्याख्यानें लिहून काढून तें लिखित व्याख्यात्यास नियामक मंडळाकडे द्यावें लागेल. निदान मागाहून तरी टिपणांवरून व्याख्यानें लिहून नियामक मंडळाचे हवालीं करावीं लागतील.

(ऊ) या व्याख्यानांचें स्वामित्व शिक्षण-प्रसारक-मंडळीच्या नियामक मंडळाचे अधीन राहील.

(ऌ) नियामक मंडळ ही व्याख्यानमाला यथाशक्य छापून प्रसिद्ध करील.

(ए) एकाद्या प्रकाशनाप्रीत्यर्थ कांहीं आर्थिक सहाय्य मिळाल्यास तें स्वीकारण्याचा नियामक मंडळाला अधिकार राहील.

(ओ) व्याख्यात्यांना नियामक मंडळ प्रवासखर्च व कांहीं संभावना-द्रव्य देईल.

(अं) निधिदाते सज्जन आणि निधिधारक नियामक मंडळ या उभयतांच्या संमतीनें वरील योजनेंत फेरबदल होऊं शकेल.

(अः) या योजनेंतील प्रकाशनें कौशिक-(ज्ञान. वेद.) व्याख्यानमाला या नांवानें प्रकाशित होईल.

# कौशिक व्याख्यानमाला

## माला १ ली

व्याख्याते : **प्रा. रा. द. रानडे**, एम्. ए.

उद्घाटक : **श्री. बा. गं. खेर**, पंतप्रधान – मुंबई राज्य

विषय : **ज्ञानदेव व हिंदी संत-कवी**

दिनांक : ६, ७ व ८ एप्रिल १९४७

## माला २ री

व्याख्याते : **प्रा. रा. ना. दांडेकर**

उद्घाटक : **श्री. मु. रा. जयकर**, बॅरिस्टर

विषय : **वैदिक देवतांचें अभिनव दर्शन**

दिनांक : १२, १३, १४ व १५ डिसेंबर १९४८

## माला ३ री

व्याख्याते : **प्रा. न. र. फाटक**, बी. ए.

उद्घाटक : **श्री. मालोजीराव नाईक निंबाळकर**, उद्योगमंत्री, मुंबई राज्य

विषय : **श्री ज्ञानदेव, एकनाथ व रामदास**

दिनांक : १४, १५, १६, १७ सप्टेंबर ५०

## माला ४ थी

व्याख्याते : **प्रा. ह. दा. वेलणकर**, एम्. ए.

उद्घाटक : न्यायमूर्ति **प्र. बा. गजेंद्रगडकर**, मुंबई हायकोर्ट

विषय : **ऋग्वेदातील भक्तिमार्ग**

दिनांक : २, ३, ४ जून १९५२

# अनुक्रमणिका अर्थात् विषयाचें क्रमवार दिग्दर्शन

**परि० ६** (पृष्ठें १६–२७): ऐहिक सुखोपभोग व दुःखपरिहार हेंच संहिताकालीन वैदिक आर्यांचें जीवनाचें ध्येय होतें असें ऋग्वेदांतील अनेक वचनांवरून दिसून येतें. देवतांच्या व्रतांच्या म्हणजे नियमांच्या उल्लंघनामुळें त्यांचा रोष होऊन मनुष्यांना अनिष्ट गोष्टींचा अंगीकार करावा लागतो म्हणून देवतांचा रोष घालवून त्यांचा प्रसाद मिळविण्याची खटपट ऋग्वेदकालीन भारतीय करीत असत.

**परि० ७** (पृष्ठें २७–३२): पारलौकिक म्हणजे स्वर्गादि लोकांतील सुखाचीहि थोडीफार जाणीव वैदिक आर्यांना होती, तथापि त्याची फारशी फिकीर त्यांना वाटत नसे असें ऋग्वेदांतील कांहीं उताऱ्यांवरून दिसून येतें.

**परि० ८** (पृष्ठें ३२–३८): निव्वळ देणगी म्हणजे हव्यें व सोम दिल्यानें देवता प्रसन्न होत नाहींत; तर त्या देणगीच्या मागें आपलेपणाची, सख्याची भावना अवश्य असली पाहिजे अशी स्पष्ट जाणीव ऋग्वेदांतील अनेक वचनांत आढळून येते. देवतेच्या मोठेपणाच्या मानानें आपली देणगी फार अल्प आहे, परंतु ती प्रेमपूर्वक दिली असेल तर देवता प्रसन्न होते अशी वैदिक आर्यांची भावना होती.

**परि० ९** (पृष्ठें ३८–४०): हव्य व सोमरस यांच्याइतकेंच स्तोत्रहि देवतांना प्रिय असतें, अशा समजुतीनें स्तोत्ररचना व स्तोत्रपठन हें वैदिक भारतीयांत परस्पर ईर्ष्येनें चालत असे व या ईर्ष्येंतच आपल्या साहित्यशास्त्राचें मूळ आहे. परंतु या चढाओढींत गरीब व प्रतिभाहीन भक्तांचा निभाव लागण्यासारखा नसल्यामुळें त्यांनीं देवतावशीकरणाचा निराळाच मार्ग म्हणजेच भक्तिमार्ग अवलंबिला.

**परि० १०** (पृष्ठें ४१–४४): देवतेच्या शारीरिक संतोषापेक्षां तिच्या मनाची व हृदयाची तृप्ति हीच अधिक श्रेष्ठ व ती संपादन करण्याचा मार्ग देवतेचें हृदय आकर्षित करून घेणें हाच होय असा निश्चय

करून वैदिक भारतीयांनीं देवतांच्या हृदयाच्या वशीकरणाचा प्रयत्न केला. हृदय हें भावनेचें व मन हें कल्पनेचें अधिष्ठान आहे हेंहि त्यांना अवगत होतें असें दिसतें.

**परि०** ११ (पृष्ठें ४४–४८): आपली देणगी व स्तुति देवतांना हृदयस्पर्शी व्हावयास पाहिजे असेल तर त्यांच्या पाठीमागें दात्या कवीच्या अंतःकरणांतील भक्तिभावनेचीच अपेक्षा असते हें वैदिक कवींनीं ओळखल्यामुळें आपली देणगी व स्तुति अंतःकरणपूर्वक आहे असें ते देवतांना वारंवार विनवून सांगतांना आढळतात. स्तुतीच्या मागें असलेला भक्तिभाव व्यक्त करण्याचा आणखी एक मार्ग म्हणजे हार्दिक उपमेचा उपयोग हाहि वैदिक कवींनीं अवलंबिलेला आहे. हार्दिक उपमा ही शोभादायक अथवा निदर्शक उपमेपेक्षां निराळी असून हिचा उपयोग श्रोत्याच्या हृदयांतील भावना व विकार जागृत करून त्या योगानें उपमेयाचें महत्त्व व जवळचेपणा पटवून देणें हाच असतो.

**परि०** १२ (पृष्ठें ४८–५३): या हार्दिक उपमांतून हृदयगम्य व हृदयनिष्ठ विकारांचें सुप्रसिद्ध अधिष्ठान असलेल्या आईबाप, भाईबंधु, सगेसोयरे यांचाच उपमान म्हणून उपयोग केलेला आहे.

**परि०** १३ (पृष्ठें ५३–६३): अन्तःकरणाच्या भावनांना महत्त्व देण्याच्या या प्रवृत्तीची दुसरी बाजू म्हणजे देवतेवर याला अनुकूल अशा दीनवत्सलत्व, नितान्त औदार्य, भक्तासाठीं हवें तें रूप घेऊन वाटेल तें करण्याची तयारी, देणगीपाठीमागील भक्तीलाच सर्व महत्त्व देण्याची प्रवृत्ति इत्यादि गुणांचा आरोप करणें हा होय व अशा गुणांची कल्पना आपल्या देवतांवर वैदिक कवींनीं केलेली आहे.

**परि०** १४ (पृष्ठें ६३–७०): निर्भीक आत्यन्तिक भक्तीचें दुसरें एक गमक म्हणजे देवाजवळील भक्ताची लडिवाळपणाची व मनमोकळी

वागणूक; अशी वागणूक तसेंच देवाचें मातेसारखें आत्यन्तिक वात्सल्य व भक्तपालनाची प्रतिज्ञा हींहि संतवाङ्मयाप्रमाणेंच ऋग्वेद-सूक्तामध्यें आढळतात.

**परि०** १५ (पृष्ठें ७०–७६): यावरून वैदिक भक्तीचें स्वरूप व वेदोत्तर भक्तीचें स्वरूप यांत तत्त्वतः फरक नाहीं; बाह्य स्वरूपांतील फरकाचें कारण पुरुषार्थांच्या बदलत्या कल्पना हेंच आहे, यांत संदेह नाहीं. याशिवाय देवतांच्या मूर्तिबद्धतेची कल्पना अद्यापि अपुरी होती म्हणून वेदकालीं सगुण उपासना अशक्य होती व सगुण उपासनेवांचून निर्भीक प्रेमरूप भक्ति वाटूं शकत नाहीं हेंहि एक वैदिक भक्तीच्या भिन्न स्वरूपाचें अन्य कारण आहे.

**परि०** १६ (पृष्ठें ७६–८२): चौथ्या मंडलांतील चोविसाव्या सूक्तांत मूर्तिपूजेचा उल्लेख आहे असें कांहीं पंडितांचें म्हणणें आहे. पण त्या सूक्ताचा व त्यासारख्या अन्य उताऱ्यांचा नीट विचार केला असतां ही कल्पना बरोबर नाहीं असेंच दिसून येईल.

**परि०** १७ (पृष्ठें ८२–८४): आमच्या आत्यन्तिक भक्तीची कल्पना व पाश्चात्यांच्या निरतिशय भक्तीची कल्पना यांत मूलगामी भेद आहे. आमच्या आत्यन्तिक भक्तीला भीतीचें, आदराचें वावडें आहे तर पाश्चात्यांच्या आत्यन्तिक भक्तींत उपास्याचा मोठेपणा व भक्ताचें लघुत्व यांचें भान आवश्यक आहे.

**परि०** १८ (पृष्ठें ८४–९०): याच भेदामुळें कांहीं पाश्चात्य पंडितांनीं ऋग्वेदांतील भक्ति वरुणसूक्तांतच आढळते, इतर सूक्तांत ती दिसत नाहीं अशी कल्पना केली आहे. परंतु आम्हां भारतीय आर्यांच्या कल्पनेची भक्ति इन्द्रसूक्तांतच दिसते, वरुणसूक्तांत दिसणारी भक्ति ही खालच्या दर्जाची आहे, ही गोष्ट परि० १७ त सांगितलेला भेद लक्षांत घेतल्यास स्पष्टपणें प्रतीत होण्यासारखी आहे.

# ऋग्वेदांतील भक्तिमार्ग

१. भक्ति या शब्दाचा मूळ धात्वर्थ पाहिला तर भक्तीचें अगदीं सर्वसाधारण स्वरूप म्हणजे आपल्यापेक्षां कोणत्यातरी बाबींत श्रेष्ठ असलेल्या व्यक्तीची सापेक्ष अगर निरपेक्ष परंतु मनःपूर्वक सेवा असें दिसतें. भक्तीचे अर्थात् उच्च, नीच, मध्यम असे अनेक प्रकार असणारच. म्हणूनच दृढ भक्ति, स्वार्थी भक्ति, दांभिक भक्ति, विरोधी भक्ति वगैरे श्रेष्ठकनिष्ठ दर्जाचे वाचक विशेषणात्मक शब्द आपण वापरतों. थोडक्यांत म्हणजे भक्ति हा एक सामान्यतः श्रेष्ठ व कनिष्ठ अशा दोन व्यक्तींमधील हार्दिक संबंध आहे व मुख्यतः भक्ति हा शब्द देव आणि मनुष्य यांच्या संबंधाचाच वाचक म्हणून समजला जातो. तथापि, औपचारिक रीतीनें मात्र हा शब्द कधीं कधीं मनुष्य-मनुष्यांमधील संबंधाला देखील लावला जातो. उदाहरणार्थ, स्वामिभक्ति, मातृभक्ति, गुरुभक्ति इत्यादि. केव्हां केव्हां तर अचेतन परंतु माननीय अशा वस्तूंच्या व माणसांच्या संबंधाला देखील भक्ति हा शब्द वापरला जातो. जसें : देशभक्ति. सर्वसाधारणपणें भक्ति शब्दाच्या अर्थांत एकान्तिकत्व, निष्ठा अगर अव्यभिचारित्व यांचा अंतर्भाव केला जातो. परंतु एकनिष्ठ भक्त, अनन्यभक्त अशा तऱ्हेच्या शब्दप्रयोगांवरून अशा अंतर्भावाची नेहमींच अपेक्षा असते असें दिसत नाहीं. शिवाय भक्तीचें म्हणजे देवमनुष्यांच्या हार्दिक संबंधाचें स्वरूप भक्ताकडून आपल्या उपास्य दैवताच्या द्वारा अपेक्षिल्या जाणाऱ्या फलावरच बरेंचसें अवलंबून असणार हेंहि थोड्याशा विचाराअंतीं दिसून येईल. उपास्य दैवताचा प्रसाद हें एक साधन आहे व तद्व्यतिरिक्त संतति, संपत्ति, स्वर्ग वगैरे पदार्थ हें अंतिम साध्य आहे अशी कल्पना ज्या वेळीं असेल त्या वेळचें

भक्तीचें स्वरूप व उपास्य दैवताखेरीज इतर सर्व गोष्टी म्हणजे इहपर लोकांतील सांसारिक सुखें हीं अनित्य असून अत्यंत तुच्छ अतएव त्याज्य आहेत अशी कल्पना प्रचलित असेल त्या काळचें भक्तीचें स्वरूप या दोन स्वरूपांत पुष्कळच भेद असणार. एकामध्यें इष्ट वस्तूंची प्राप्ति व अनिष्ट वस्तूंचा परिहार या दोन ध्येयांच्या पूर्तीसाठीं उपास्य देवतेच्या सेवेवांचून अन्य मार्ग कठिण व अनिश्चितफलदायी आहेत अशा भावनेचें प्राधान्य असतें, तर दुसऱ्यामध्यें सांसारिक म्हणजे इन्द्रियभोग्य सुखें व जीवन दुःखप्रायच आहेत, त्यांच्या प्राप्तीनें चिरकालिक शांति व आनन्द प्राप्त होणार नाहींत व त्या शान्तीच्या व आनन्दाच्या प्राप्तीची इच्छा असल्यास उपास्य दैवताच्या प्रसादाचीच अपेक्षा आहे, यासाठीं असा प्रसाद हेंच भक्तांचें सर्वस्व व अंतिम ध्येय आहे अशी कल्पना आढळून येते. म्हणजे एका अर्थांत **भोगप्रधान** स्वरूपांत उपास्य दैवताचा प्रसाद हें अनन्यसाधारण असें **साधन** मानलें जातें व दुसऱ्या अर्थांत **त्याग-प्रधान** स्वरूपांत असा प्रसाद हें स्वतःच **साध्य** बनून राहतें; व या महत्त्वाच्या भेदाला अनुसरूनच भक्तीच्या बाह्य स्वरूपांतहि भेद दिसणार हें स्पष्ट आहे. म्हणूनच वर म्हटल्याप्रमाणें त्या त्या कालखंडांतील भक्तीच्या साध्याच्या म्हणजेच पुरुषार्थाच्या कल्पनेप्रमाणेंच बदलत जाणार व या कारणाकरितां **वेदकालीन** भक्तीचें स्वरूप **वेदोत्तरकालीन** भक्तीच्या स्वरूपाप्रमाणेंच असलें पाहिजे अशी अपेक्षा करणें बरोबर ठरणार नाहीं. तथापि, भक्ति या शब्दाच्या अर्थाचें जें एक सर्वसंमत अंग म्हणजे सेवेच्या मुळाशीं असलेला व प्रेम, अनुराग इत्यादि शब्दांनीं व्यक्त केला जाणारा जो हृदयाचा विकार तो मात्र भक्तीच्या कोणत्याहि स्वरूपांत अनुस्यूत असला पाहिजे याबद्दल दुमत होण्याचा संभव नाहीं. पुष्कळदां तर भक्ति शब्दाच्या अर्थाच्या या अंगालाच प्राधान्य दिलें जाऊन भक्ति हा शब्द अनुरक्ति, प्रेम या अर्थींच वापरला जातो. कारण उघडच आहे

कीं, भक्तीमध्यें प्रत्यक्ष सेवा व तिचें स्वरूप यांना महत्त्व नसून त्या सेवेमागील हृदयाच्या भावनेचेंच महत्त्व अधिक आहे. म्हणूनच शाण्डिल्य मुनींनीं 'सा परानुरक्तिरीश्वरे' असें भक्तीचें लक्षण केलें आहे.

२. ज्याप्रमाणें इतर मानवी कल्पना व भावना निरनिराळ्या कालखंडांत कमीअधिक प्रमाणांत विकास पावलेल्या अशा आपणांस आढळतात, त्याचप्रमाणें भक्तीच्या कल्पनेचा विकास देखील आपल्या इतिहासाच्या भिन्नभिन्न कालखंडांत निरनिराळ्या स्वरूपांत आपणांस सांपडेल अशी अपेक्षा करणें चुकीचें होणार नाहीं. सुदैवानें भरतखंडांत कित्येक हजार वर्षेंपर्यंत अखंड व अव्याहत चालू असलेल्या उपलब्ध वाङ्मयाच्या प्रवाहामुळें भारतीय आर्यांच्या बहुतेक सर्व कल्पनांचा, भावनांचा, शास्त्रांचा, शिल्पांचा व विद्या वगैरेचा प्रारंभ व विकास अभ्यासकांच्या स्पष्टपणें प्रत्ययास येतो. ज्याला पाश्चात्य लोक इतिहास म्हणतात त्याच्याबद्दल भारतीय आर्यांत, विशेषतः प्राचीन व मध्ययुगीन कालखंडांत, प्रायशः औदासीन्यच दिसून येतें हें खरें; परंतु त्याचें वास्तविक कारण त्यांच्यांतील ऐतिहासिक दृष्टीचा अभाव हें नसून त्यांच्यामधील स्वभावतःच असलेला **अहंगंडाचा अभाव** व **तत्त्वैकनिष्ठ दृष्टि** हें आहे. इतिहासाचें मुख्य प्रयोजन म्हणजे दुसऱ्यांच्या अनुभवावरून स्वतः शहाणपणा शिकणें हें प्रमेय गृहीत धरलें गेल्यानें घटनांना, विचारांना, व अनुभवांनाच प्राधान्य दिलें गेलें व त्याच प्रमाणांत त्या त्या घटनांच्या आधारभूत, विचारांच्या प्रवर्तक, व अनुभवाच्या अनुभावक व्यक्तींबद्दलचें औदासीन्य वाढत गेलें; किंबहुना, त्या त्या व्यक्तींना त्यांचे उदात्त आचार, विचार, कल्पना व अनुभव इत्यादिकांमुळेंच मोठेपणा व प्राधान्य प्राप्त झालें व म्हणून त्या व्यक्तींच्या आयुष्यांतील त्यांचे श्रेष्ठ विचार, आचार, कल्पना व अनुभव वगैरेशीं साक्षात् संबंध नसलेल्या इतर सामान्य घटनांचा परामर्श हा गौण

आहे असें समजलें गेलें. यासाठीं अमुक एक ग्रन्थकार अगर विचार-प्रक्षोभक तत्त्ववेत्ता हा कोणत्या काळीं जन्मास आला व त्याचें सामान्य जीवन कशा प्रकारचें होतें याची चर्चा प्राचीन आर्यांनीं फारशी केली नाहीं. कवष नांवाचा एक दासीपुत्र होता, त्यानें आपल्या भक्तीनें सरस्वतीला प्रसन्न करून घेतलें हें पाहून प्राचीन ऋषींनीं त्याला आपल्या समाजांत घेऊन यज्ञांत भाग घेऊं दिला, एवढाच इतिहास आपणांस मिळेल. यापलीकडे त्या कवषाच्या जीवनांतील इतर घटनांचा मागमूसहि लागणार नाहीं. हीच गोष्ट महान् तत्त्ववेत्ता याज्ञवल्क्य, महान् सत्य-वक्ता सत्यकाम जाबाल, महान् तत्त्वनिष्ठ सयुग्वा रैक्व इत्यादिकांचीहि आहे. वेदोत्तरकालीं देखील हीच प्रवृत्ति दिसून येते. किंबहुना उप-निषत्कालीन अत्युच्च तत्त्वज्ञानाच्या सार्वजनीन वाचिक प्रसारामुळें ही ऐहिक जीवनाबद्दलची अनास्था अधिकच वाढली, व याचा परिणाम म्हणून मोठमोठ्या ग्रन्थकारांबद्दल, अगर कवींबद्दल, फुटकळ दंतकथांखेरीज आज फारसा इतिहास उपलब्ध होत नाहीं. सामान्य माणसांच्या स्वाभाविक कथाप्रियत्वामुळें अशा थोर व्यक्तींच्या ऐहिक जीवनांतील कौतुकावह अशा कांहीं घटनांशीं संबद्ध असलेल्या कांहीं अंशीं परंपराप्राप्त आणि खऱ्या व कांहीं अंशीं काल्पनिक अशा दंतकथा मात्र पुष्कळ वेळां प्रचलित होतात. तथापि सादृश्याच्या जोरावर एकच दंतकथा अनेक व्यक्तींशीं निगडित असलेली अशीहि आढळते; व म्हणूनच बऱ्याच अंशीं अशा दंतकथांचा घटनानिष्ठ इतिहासाला फारसा उपयोग नसतो. प्राचीन आर्यांच्या या तत्त्वनिष्ठ व व्यक्तिशून्य वैचारिक प्रवृत्तीचा एक परिपोष महाभारतकाळा-पासून विशेष प्रचारांत आलेल्या पशुपक्ष्यांच्या गोष्टींमध्यें झालेला दिसून येतो. शान्तिपर्वाच्या राजधर्मांत प्रथम व नंतर पञ्चतन्त्र, हितोपदेश इत्यादि ग्रन्थांत अशा तऱ्हेच्या गोष्टी माणसांना राजनैतिक व व्यावहारिक शहाण-पणा शिकविण्यासाठीं रचल्या गेल्या आहेत. यांत मनुष्याच्या आयुष्यांतील

अडचणी व त्यांचा परिहार यांचा आरोप पशुपक्ष्यांच्या जीवनांतील घडामोडींवर करून व्यावहारिक अगर राजनैतिक धडे शिकविले जातात. कौतुकोत्पादकता हा गुण अशा गोष्टींत असल्यामुळें काव्याप्रमाणेंच नीतीचे पाठ सुलभतेनें शिकविण्यांत त्यांचा उपयोग होतो हें उघड आहे. तथापि इतकें मात्र खरें कीं, अशा या प्रवृत्तीमुळें आर्यांच्या इतिहासाच्या एका म्हणजे व्यक्तिनिष्ठ अंगाची फारच हेळसांड झालेली आहे.

३. वर परिच्छेद २ च्या आरंभीं म्हटल्याप्रमाणें आर्यांच्या संस्कृतीच्या म्हणजेच वैचारिक जीवनाच्या भिन्नभिन्न घटकांचा अर्थात् त्यांच्या भावना, विचार, कल्पना, विद्या, शिल्पें वगैरेचा संपूर्ण इतिहास आर्यांच्या या अखण्ड वाङ्मयप्रवाहांत प्रारंभ, उत्क्रान्ति व परिणति या तीनहि अवस्थांतून उत्तम रीतीनें प्रतिबिम्बित झालेला पाहावयास मिळतो. तसेंच मन्त्रशास्त्र, ज्योतिःशास्त्र, औषधिशास्त्र, राजनीतिशास्त्र वगैरेप्रमाणेंच भक्तिमार्ग हेंहि एक साधन आहे व त्यांच्याप्रमाणेंच त्याचा विकासहि त्या त्या साधनांच्या साध्याविषयींच्या कल्पनेवरच बहुशः अवलंबून असतो हेंहि आपण वर पाहिलेंच आहे. म्हणून देवतांवरील भक्तीचें साध्य अथवा प्रयोजन ऋग्वेदकालांत काय समजलें जात असे व त्याच्यांत पुढील कालखण्डांत काय काय व कसे कसे फरक होत गेले हें पाहणें जरूरीचें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे भक्तीचें साध्य म्हणजे पुरुषार्थ व या पुरुषार्थाच्या कल्पनेच्या विकासावरच भक्तीच्या कल्पनेचा अथवा स्वरूपाचा विकास अवलंबून असल्यामुळें प्राचीन भारतीयांच्या पुरुषार्थाविषयींच्या कल्पना संहिताकालीं, ब्राह्मणकालीं, उपनिषत्कालीं व वेदोत्तरकालांत कशा कशा परिवर्तन पावल्या ह्याचा इतिहास आपणांस वैदिक व वेदोत्तर वाङ्मयावरून उपलब्ध करून घेणें आवश्यक आहे. वेदोत्तरकालांत पुरुषार्थांचा चार हा आंकडा जवळ जवळ निश्चित झाला

असें आढळून येतें व या चारांपैकीं धर्म, अर्थ व काम हा त्रिवर्ग ऐहिक जीवनांतील उच्च पुरुषार्थ व चौथा म्हणजे मोक्ष हा परमपुरुषार्थ म्हणजे आयुष्यांतील अत्युच्च व शेवटचें ध्येय आहे असेंहि ठरलेलें दिसतें. मोक्ष अथवा मुक्ति म्हणजे बन्धनांतून सुटका. मोक्ष हें आत्यंतिक म्हणजे शेवटचें प्रयोजन समजलें गेल्यामुळें त्याच्यापूर्वीं उपलब्ध होणाऱ्या धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गाचा अंतर्भाव साहजिक बंधनांतच—अर्थात् पारमार्थिक बंधनांत—करावा लागतो व मोक्ष म्हणजे त्रिवर्ग-ध्येयभूत असलेल्या जीवनांतून सुटका असाच अर्थ होतो. म्हणजे ज्या ऐहिक जीवनांत धर्म, अर्थ व काम हे पुरुषार्थ मानले जातात तें ऐहिक जीवन व ते पुरुषार्थ बंधभूत म्हणजे परमार्थतः अनिष्ट अतएव त्याज्य आहेत. जरी हें ऐहिक जीवन बाह्यतः या तीन पुरुषार्थांच्या कचित्कालिक संपूर्ण अगर अंशतः उपलब्धीमुळें ग्राह्य व सुखमय वाटलें तथापि त्यांत दुःखाचा भाग अतिशय मोठा आहे, म्हणूनच विद्वान् लोक या सांसारिक जीवनाला कष्टमय व त्याज्य असें बंधन मानतात असाच निष्कर्ष मोक्षाला परमपुरुषार्थ मानण्याच्या कल्पनेंतून काढावा लागतो. परंतु वेदोत्तरकालीन मोक्षरूप परमपुरुषार्थाच्या या कल्पनेचा फारसा मागमूस संहिताकालीं व ब्राह्मणकालीं लागत नाहीं. उपनिषत्कालीं मात्र या मोक्षाच्या कल्पनेचा जो मुख्य आधार म्हणजे बाह्य जगाचें अनृतत्व व फोलपणा व त्याबरोबरच बाह्य जगाचें अधिष्टान जें परब्रह्म त्याचेंच केवळ सत्यत्व या दोहोंचाहि संपूर्ण आविष्कार झालेला आढळतो. तथापि या कालखंडांत देखील ऐहिक जीवन हें अत्यंत कष्टमय आहे—बन्धनात्मक आहे—म्हणून त्याज्य आहे या कल्पनेचा पुरस्कार कचित् आढळतो. जवळजवळ दिसतच नाहीं म्हटलें तरी चालेल.

४. ऋग्वेदसंहितेच्या काळांत गाई, घोडे, रथ, दीर्घायुष्य व शूर वीर पुत्र इत्यादि गोष्टींनाच पुरुषार्थ मानलें जात होतें हें अनेक सूक्तांतील

प्रार्थनांवरून स्पष्ट दिसून येतें. आपल्या सभोंवतालच्या जगांत आपल्यावर सत्ता गाजवणाऱ्या दृष्ट व अदृष्ट अशा अनेक सामर्थ्यवान् देवता आहेत व त्यांची योग्य मार्गानें आराधना केली असतां त्या आपणांस प्रसन्न होऊन इष्ट फळें देतात व अनिष्ट गोष्टीचें निवारण करतात अशी सर्वसाधारण समजूत सूक्तद्रष्ट्यांच्या प्रार्थनेवरून स्पष्टपणें दृग्गोचर होते. यज्ञयाग करून या देवतांना हविर्भाग अर्पण केला असतां त्या लढणाऱ्या वीरांना शत्रूंचा पाडाव करण्याचें सामर्थ्य देतात, ब्राह्मणांना यजमानांच्या दक्षिणेच्या रूपानें गाई, घोडे, रथ वगैरे ऐश्वर्य प्राप्त करून देतात व एकंदरींत ब्राह्मणाला काय किंवा लढवय्या क्षत्रियाला काय, सर्व प्रकारच्या काम्य वस्तू प्राप्त करून देतात असा दृढ विश्वास ऋक्सूक्तांच्या वाचनावरून निःसंशय दिसतो, आणि म्हणूनच एकमेकांच्या चढाओढीनें या देवतांना वश करून घेण्याचे अविश्रान्त प्रयत्न आपल्या स्वतःसाठीं किंवा आपल्या यजमानासाठीं वैदिक ऋषी करीत असतात हें अनेक सूक्तांतील याबद्दलच्या स्पष्ट उल्लेखांवरून दिसून येतें. सोमरस, नाना प्रकारचीं हव्यें व अनेक प्रकारचीं देवतांच्या गुणवर्णनपर स्तोत्रें हीं देवतांना आपणांकडे वश करून घेण्याचीं साधनें आहेत व म्हणून उत्तमांत उत्तम तयार केलेला सोमरस व हवि व सुन्दरांत सुन्दर, ओजस्वी व नवीन धर्तीवर रचलेलीं स्तोत्रें दैवताला अर्पण करण्याचे ऋषींचे प्रयत्न सातत्यानें चालू असतात. अशा तऱ्हेनें ऋग्वेदसंहिताकालीं ऐहिक सुखोपभोग हा उच्च पुरुषार्थ मानला जात होता व त्याची प्राप्ति करून घेण्यासाठीं आपल्या सभोंवतालच्या विश्वातील अनेक स्वरूपांनीं प्रकट होणाऱ्या एक किंवा अनेक देवतांचें यज्ञादि मार्गानें आराधन अगर सेवा अथवा भक्ति हाच मार्ग अवलंबिला जात होता. परंतु अशा रीतीनें बराच काळ लोटल्यावर विशिष्ट यज्ञादिक कर्म केलें असतां कांहींएक विशिष्ट फल नियमानें मिळतें, त्या कर्माबरोबर फल

देणाऱ्या देवतेबद्दलची श्रद्धा, भक्ति, प्रीति वगैरे असलेंच पाहिजे असें नाहीं अशी समजूत होत गेली. म्हणजे देवतेवरच्या श्रद्धेचें व भक्तीचें महत्त्व हळूहळू कमी होत जाऊन केवळ कर्माचेंच महत्त्व वाढत गेलें व संहिताकालीन भक्तिमार्गाचें वैभव कमी होऊन त्याच्या जागीं शुद्ध कर्ममार्गाला श्रेष्ठत्व प्राप्त झालें. नंतर ब्राह्मणकालांत यज्ञयागादि कर्मांतून देवतांना जवळजवळ शोभेचें परंतु आवश्यक असें गौण स्थान मिळून प्रत्यक्ष यज्ञयागादिक कर्माला पुरुषार्थप्राप्तीच्या बाबतींत प्राधान्य आलें. देवतांनीं विधिपूर्वक दिलेलें हव्य ग्रहण करावें व तदनुसार ठरलेलें फल कर्मकर्त्यास प्राप्त करून द्यावें; यांत त्यांच्या मर्जीचा, खुषीचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं, अशी कल्पना त्या कालांत दृढमूल झाली. याचा अर्थ असा कीं, प्राचीन भारतीय आर्य हळूहळू अंतर्मुख होत चालले. आत्मोन्नति व पुरुषार्थप्राप्ति यांसाठीं स्वतःच्या प्रयत्नांवरच अवलंबून राहिलें पाहिजे. नुसत्या देवतांच्या प्रसादानेंच कार्य साधणार नाहीं. योग्य रीतीनें कर्म व प्रयत्न केले असतां देवता प्रसन्न झाल्याच पाहिजेत व त्यांनीं त्या त्या कर्माचें विहित फल दिलेंच पाहिजे अशी समजूत दृढ होत चालली. आपणांसुद्धां भोंवतालच्या जगाच्या उन्नतीचें व पालनपोषणाचें मूळ देवतांच्या प्रसादांतच आहे व त्या प्रसादाचें साधन म्हणजे यज्ञयागादिक कर्में असा विश्वास संहिताकालीं रूढ होता तर याच्या उलट या सर्व गोष्टींचा भार आपण विधिपूर्वक केलेल्या यज्ञादि कर्मांवरच आहे, देवता व त्यांचा प्रसाद हे त्या त्या कर्माच्या सांगतेचे केवळ साधनभूत आहेत असा निश्चय ब्राह्मणकालीं प्राचीन भारतीयांनीं केला. याच सुमारास प्राचीन भारतीयांचीं आपापसांतील अगर शत्रूंबरोबरचीं युद्धें थांबून आर्यांनीं व्यापिलेल्या सर्व प्रदेशाला अंतर्बाह्य स्वास्थ्य लाभलें होतें. तथापि प्राचीन भारतीयांच्या दोन प्रमुख वर्गांपैकीं म्हणजे ब्राह्मण व क्षत्रिय यांपैकीं ब्राह्मणांनीं पूर्वींप्रमाणेंच आपले यज्ञयाग चालू ठेवले, एवढेंच नव्हे, तर त्यांत अनेक बारीकसारीक

गोष्टींची चर्चापूर्वक भर घालण्याचेंहि काम चालू ठेवलें. मोठमोठाल्या यज्ञांचें याजमान अर्थात् पूर्वींप्रमाणेंच संपन्न क्षत्रिय राजांकडेच असे व त्यांच्याकडून यज्ञनिपुण ब्राह्मणांना भरपूर दक्षिणाहि मिळत असे. परंतु आतां पूर्वींप्रमाणें क्षत्रिय राजांना यज्ञद्वारा मिळणाऱ्या इंद्रादि देवतांच्या मदतीची अपेक्षा नव्हती; कारण शत्रूंशीं सामना देण्याचे वेळेस तिची फार निकडीची जरूर असे व तशीं युद्धें आतां जवळजवळ बंदच झालीं होतीं. तरी पण आपल्या ऐश्वर्याच्या प्रदर्शनासाठीं व इतर ऐहिक कामनांच्या पूर्तीसाठीं ते ब्राह्मणांकडून पूर्वींप्रमाणेंच यज्ञ करवीत राहिले. शिवाय यज्ञांतील दक्षिणेचा प्रतिग्रह हें ब्राह्मणांच्या उपजीविकेचें एक प्रमुख साधन असल्यामुळें विद्वान् म्हणजे यज्ञमार्गप्रवीण अशा ब्राह्मणांना मदत करण्याच्या बुद्धीनेंहि क्षत्रिय राजे यज्ञ करवीत असत. परंतु जात्याच बुद्धिमान् अशा क्षत्रिय वर्गाला आतां चित्ताचें स्वास्थ्य बिघडविणारें युद्धादिक काम फारसें नसल्यानें त्यांची बुद्धि त्यांना स्वस्थ बसूं देईना. यज्ञाच्या बाह्य तंत्रांत अत्यंत प्रवीण असलेल्या ब्राह्मण वर्गाकडे पाहून यज्ञादिक कर्माच्या निश्चित कार्यकारितेबद्दल त्यांच्या मनांत विचार घोळूं लागले व हळूहळू यज्ञादिक कर्माच्या तात्त्विक विफलतेबद्दल त्यांची खात्री पटत चालली. सर्व विश्वाचें अंतर्यामीं तत्त्व एकच आहे व यज्ञयागादिकांनीं मिळणारीं फलें हीं अस्थिर म्हणून त्याज्य आहेत. यज्ञाचें बाह्यांग म्हणजे क्रिया अगर तंत्र यांच्या योगानें या अंतर्यामी तत्त्वाची प्राप्ति केव्हांच होणार नाहीं. अंतर्गत यज्ञानें म्हणजे विचार, श्रद्धा, पावित्र्य वगैरे साधनांनींच या ब्रह्मात्मैक्याचें ज्ञान व अनुभव प्राप्त होतील व हाच खरा पुरुषार्थ आहे असे ठळक सिद्धान्त त्यांच्यांतील थोर व विचारवंत नेत्यांनीं निश्चित केले. प्रारंभीं या नवीन सिद्धान्तांचा प्रसार फारसा झाला नाहीं. कारण एक तर क्षत्रियाला तत्कालीन समाजव्यवस्थेप्रमाणें सार्वजनिक रीत्या अध्यापनाचा अधिकार नव्हता, व दुसरें म्हणजे आपणांला विद्वान् व अध्यापक म्हणविणाऱ्या

ब्राह्मण वर्गाबद्दल थोडीशी, खऱ्या विद्वानाला लौकिक विद्वानाबद्दल साहजिक वाटणारी ईर्ष्येची झुळूक. तथापि तत्कालीन ब्राह्मणांच्या तीव्रतम जिज्ञासु वृत्तीमुळें या क्षत्रिय श्रेष्ठांच्या उपनिषद् अगर रहस्य विद्येचा ब्राह्मणवर्गांत हळूहळू परिस्फोट होऊं लागला, व त्यांच्या स्वभावतःच तल्लख बुद्धीला थोडीशी चालना मिळाल्याबरोबर त्यांनीं ही उपनिषद् विद्या, थोडें क्षत्रियांच्या पोटांत शिरून, थोडें स्वतःच्या बुद्धीनें असें करून संपूर्णतया आत्मसात् केली व तिचा सार्वत्रिक प्रसार देखील केला. आपला स्वाभाविक वर्णाभिमान बाजूला ठेवून मोठमोठे तत्त्ववेत्ते ऋषी क्षत्रिय राजांकडे जाऊन, त्यांचें शिष्यत्व पत्करून त्यांच्याजवळ असलेली आत्मविद्या अध्ययन करूं लागले. अजातशत्रु काश्य (बृ. २.१.१४-१५; कौ. ४.१९), अश्वपति कैकेय (छां. ५.११-१७), चित्र गार्ग्यायणि (कौ. १), प्रवहण जैवलि (छां. ५.३; बृ. ६.२.८) व जनक वैदेह (श. ब्रा. ११.६.२) या तत्त्ववेत्त्या राजांनीं आपणांकडे येऊन दुसरी कोणतीहि दक्षिणा न घेतां अध्यात्मविद्येच्या बाबतींत त्यांचें शिष्यत्व पत्करूं इच्छिणाऱ्या मोठमोठ्या ऋषींना उपनिषद् विद्या शिकविल्याचे स्पष्ट उल्लेख आहेत. मात्र इतकें खरें कीं, याच काळांत बुद्धिमान् यज्ञमार्गी ब्राह्मणवर्गाच्या मनांतहि असेच विचार—म्हणजे यज्ञयागाची विफलता व विश्वाच्या बुडाशीं असलेल्या मूळ तत्त्वाबद्दल उत्कट जिज्ञासा हे—घोळत होते व म्हणूनच ते परस्परांशीं व इतर ज्ञात्यांशीं—मग ते ब्राह्मण असोत अगर क्षत्रिय असोत—चर्चा करून कांहीं प्रमेयें निश्चित करूं लागले होते. यासाठीं उपनिषद् विद्या ही संपूर्णतया अथवा मुख्यतया क्षत्रियवर्गांतच उगम पावली असें म्हणणें सयुक्तिक होणार नाहीं. असो. याचा परिणाम मात्र असा झाला कीं, संहिताकालांत प्रामुख्यानें चमकणाऱ्या परंतु ब्राह्मणकालांत यज्ञांत शोभेच्या स्थानाखेरीज महत्त्व नसणाऱ्या इन्द्रादि देवतांची प्राचीन भारतीयांच्या चित्तभूमींतून जवळजवळ उचलबांगडी झाल्यासारखीच झाली. कारण आतां

कर्मयोगाचेंहि महत्त्व नाहींसें होऊन ज्ञानमार्गालाच संपूर्ण प्राधान्य आलें व त्याबरोबरच प्राचीन भारतीय पूर्णपणें अंतर्मुख झाले. संहिताकालांत बहिर्मुख आर्यांनीं इन्द्रादि बाह्य देवतांनाच विश्वाचा मध्यबिंदु कल्पिलें व भक्तिमार्ग प्रचलित केला. ब्राह्मणकालीं देवतांना व आपल्या अंतरात्म्यालासुद्धां गौण स्थान देऊन आपण केलेल्या यज्ञयागादिक कर्मांनाच विश्वाच्या नाभीचें अगर मध्यबिंदूचें स्थान दिलें व कर्ममार्ग अस्तित्वांत आणला. उपनिषत्कालीं याच्याहि मागें जाऊन देवतांना व आपण केलेल्या यज्ञयागादि कर्मांना देखील गौणत्व देऊन केवळ सर्व विश्वाचा अंतर्यामी म्हणून असलेल्या आत्म्याला अगर ब्रह्मालाच सर्व महत्त्व दिलें व ज्ञानमार्गाचा प्रसार आरंभिला. याप्रमाणें वेदकालाच्या या तीन खंडांत अनुक्रमानें भक्तिमार्ग, कर्ममार्ग व ज्ञानमार्ग यांना प्राधान्य मिळालें व तदितर मार्ग मागें पडले. प्रस्तुत विषयाचे दृष्टीनें बोलावयाचें म्हणजे संहिताकाळांत सुरू झालेला भक्तिमार्ग पुढील दोन कालखंडांत मागें पडला, व साहजिकच भक्तीच्या कल्पनेची वाढ खुंटली. याचें कारण प्राचीन भारतीयांच्य पुरुषार्थ व त्याचें साधन याविषयींच्या कल्पनेंत होत गेलेला तात्त्विक व मूलगामी भेद हेंच आहे या गोष्टीचें विस्मरण होऊं देऊं नये. कारण हा लहानसा सिद्धान्त या प्रबन्धाचा एक प्रमुख आधारस्तंभ आहे.

५. वेदांतील भक्तिमार्गाचा हा थोडक्यांत सारांशभूत असा इतिहास आहे. उपनिषत्कालाचे शेवटीं शेवटीं मात्र भक्तीच्या कल्पनेनें पुन्हा उचल खाल्ली. श्वेताश्वतरांत तर भक्ति हा शब्दच नेहमींच्या अर्थानें म्हणजे प्रेम, अनुराग या अर्थानें उपयोजिला आहे. पाहा—

**यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।**
**तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥**

अर्थ : ‘ज्याची देवावर व जशी देवावर तशीच गुरूवर अत्यंत भक्ति

म्हणजे पराकाष्ठेचें निष्ठापूर्वक प्रेम असेल त्या थोर पुरुषाला या वर सांगितलेल्या गोष्टी स्पष्टपणें कळतात.' (श्वे. ६.२३). तसेंच सर्वान्तर्यामी ईश्वर हाच जगाचा उत्पत्तिस्थितिसंहारकर्ता असून त्याच्या ज्ञानानेंच मुक्ति मिळते; हाच जगाचा आत्मा असून ज्या मनुष्यावर त्याचा अनुग्रह होईल यालाच तो सत्य असें आत्मस्वरूप प्रकट करून दाखवितो असेंहि कठोपनिषदांत प्रतिपादिलें आहे. पाहा—

**अशरीरं शरीरेष्वनवस्थेष्ववस्थितम् ।**
**महान्तं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ॥**
**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ।**
**यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम् ॥**

अर्थ : 'अनित्य अशा शरीरांत राहणाऱ्या परंतु अमूर्त व कूटस्थनित्य अशा त्या विश्वव्यापी परमात्म्याचें ज्ञान करून घेतल्यावर बुद्धिमान् पुरुष शोकमुक्त होतो. हा आत्मा केवळ दुसऱ्याच्या उपदेशानें, स्वतःच्या बुद्धीनें, अगर पुष्कळशा अध्ययनानेंहि प्राप्त होण्यासारखा नाहीं. तर ज्या माणसाचा हा परमात्मा स्वतःच अंगीकार करतो त्यालाच तो प्राप्त होण्यासारखा आहे. त्यालाच हा आत्मा आपलें स्वरूप प्रकट करून दाखवितो.' (कठो. १.२.२२,२३). परमात्मा अर्थात् आपणांवर निःसीम भक्ति असलेल्या माणसाचाच अंगीकार करणार व त्यालाच आत्मस्वरूपाचा साक्षात्कार घडविणार हें उघड आहे. याच सर्वान्तर्यामी देवाला ईश, ईश्वर, नारायण, शिव, महेश्वर वगैरे निरनिराळीं नांवें दिलीं जाऊन भारतरामायणकालीं सगुण साकार ईश्वराच्या कल्पनेची व त्याच्याचबरोबर भक्तीच्या कल्पनेची पूर्ण वाढ झाली. सगुण परमेश्वराची भक्ति हा हरएक अडचणींवर शेवटचा रामबाण उपाय म्हणून भगवद्गीतेंत भक्तिमार्गाचा फार महती गायिली आहे. पुन्हा पुन्हा तत्त्वज्ञानासंबंधीं अनेक संशय उपस्थित होतील त्या सर्वांचें निराकरण करण्याचा निश्चित मार्ग सरते-

शेवटच्या दोन श्लोकांत श्रीकृष्णांनीं अर्जुनाला सांगितला. तो असा :

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥**
**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥**

अर्थ : 'माझ्या ठिकाणीं मन स्थिर करून माझा भक्त व पूजक होऊन मलाच नमस्कार कर. तूं मला प्रिय आहेस. अशा रीतीनें तूं मला येऊन मिळशील हें अगदीं खरें आहे असें मी प्रतिज्ञेवर सांगतों. सर्व प्रकारच्या धर्मांचा त्याग करून मलाच केवळ शरण जा. मी तुला सर्व पापांतून मुक्त करीन. बिलकुल शोक करूं नकोस.' (१८.६५-६६ ). इतर सर्व देवता या एकाच अन्तर्यामी सर्वेश्वराचीं भिन्न भिन्न स्वरूपें आहेत ही कल्पना मात्र उपनिषत्कालानंतर सर्वसाधारण समाजांतहि रूढ होत गेली. वास्तविक पाहिलें तर सर्व जगाचा अधिष्टानभूत असा एकच सर्वात्मक ईश्वर आहे व इन्द्र, वरुण, अग्नि, मातरिश्वा अगर यम या देवता देखील त्याचींच भिन्नभिन्न रूपें आहेत ही स्पष्ट कल्पना व हा महासिद्धान्त ऋग्वेदसूक्तांतून अनुस्यूत असलेला स्पष्टपणें दिसून येतो. या सर्वात्मक ईश्वराला विश्वामित्रांनीं वृषभधेनू असें नांव देऊन जगाच्या मातेचें व पित्याचें अशीं दोन्ही कर्मे तोच करतो असें सुचविलें आहे. पाहा—

**तदिन्न्वस्य वृषभस्य धेनोरा नामभिर्ममिरे सक्म्यं गोः ।**
**अन्यदन्यदसुर्यं वसाना नि मायिनो ममिरे रूपमस्मिन् ॥**

अर्थ : 'मायाशक्तियुक्त देवांनीं सर्व प्रकारचें सार्वभौम सामर्थ्य धारण करून या वृषभरूपी दुभत्या गाईच्या आत्मरूपाला (सक्म्य) निरनिराळीं नांवें देऊन परिमित केलें व (या नांवागणिक) निरनिराळ्या रूपांची तिच्यावर योजना केली.' (३.३८.७). म्हणजे देवांनीं या परब्रह्मावर नामरूपात्मक मायेचा आरोप करून विश्वोत्पत्ति केली असा भावार्थ.

नासदीय सूक्तांत सुद्धां सृष्टीच्या उत्पत्तीच्या वेळीं एकाच परमतत्त्वानें स्त्रीचें धारणपोषणादिकर्म व पुरुषाचें उत्पादनकर्म हीं दोन्ही केलीं असें पांचव्या ऋचेंत स्पष्ट म्हटलें आहे :

**रेतोधा आसन् महिमान आसन् स्वधा अवस्तात् प्रयतिः पुरस्तात् ।**

अर्थ : 'त्या वेळीं म्हणजे जगदुत्पत्तीचे वेळीं वीर्यनिषेक करणारे देवहि होते व (तो स्वीकारून वाढविणारे) मोठे देवहि होते. धारणपोषण करणारी शक्ति तळीं होती व प्रक्षेप करणारी शक्ति वरतीं होती.' (१०.१२९.५). बृहदारण्यक उपनिषदांतहि अशीच प्रक्रिया सांगितली आहे :

**आत्मैवेदमग्र आसीत्पुरुषविधः । स नैव रेमे । तस्मादेकाकी न रमते ।**
**द्वितीयमैच्छत् । स हैतावानास यथा स्त्रीपुमांसौ संपरिष्वक्तौ ।**
**स इममेवात्मानं द्वेधापातयत् । ततः पतिश्च पत्नी चाभवताम् ॥**

अर्थ : 'प्रारंभीं हें (सर्व जग) केवळ आत्मरूपच होतें व त्याचा आकार पुरुषाप्रमाणें होता. परंतु त्याला एकट्याला चैन पडेना. म्हणूनच माणसाला एकट्यानें चैन पडत नाहीं. त्यानें सोबत्याची इच्छा केली. त्याबरोबर एकमेकांला बिलगलेल्या स्त्रीपुरुषांप्रमाणें त्याचा आकार झाला. मग त्यानें आपले स्वतःचेच दोन भाग पाडले. त्यापासून पति व पत्नी उत्पन्न झालीं.' (बृ. उ. १.४.१,३). वर निर्दिष्ट केलेल्या नासदीय सूक्तांतच सातव्या ऋचेंत परमतत्त्वाला जगाचा उत्पादक व अध्यक्ष असें म्हणून त्याचें ज्ञान असलें तर त्यालाच असेल म्हणजे तें अत्यंत दुर्लभ आहे असें सुचविलें आहे. पहिल्या मंडलांतील ऋचा तर सुप्रसिद्धच आहे :

**इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान् ।**
**एकं सद् विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥**

अर्थ : 'त्याला इन्द्र, मित्र, वरुण अगर अग्नीहि म्हणतात. मोठ्या पंखांचा आकाशांतील सुंदर पक्षी म्हणजे सूर्यहि तोच. विद्वान् लोक एकाच सद्रूपाला निरनिराळ्या नांवांनीं संबोधितात. त्यालाच अग्नि, यम अथवा

मातरिश्वा असेंहि म्हणतात.' (१.१६४.४६). दहाव्या मंडलाच्या १२१ व्या सूक्तांत याच सर्वात्म्याला हिरण्यगर्भ व प्रजापति अशीं नांवें देऊन त्यालाच देवाधिदेव असें म्हटलें आहे. पाहा—

**हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत् ॥ १ ॥**
**यो देवेष्वधि देव एक आसीत् ॥ ८ ॥**
**प्रजापते न त्वदेतान्यन्यो विश्वा जातानि परि ता बभूव ॥ १० ॥**

अर्थ : 'जगाच्या प्रारंभीं उत्पन्न वस्तुमात्राचा एकटा एक स्वामी हिरण्यगर्भ हाच केवळ होता. जो सर्व देवांमध्यें एकटा एकच देव होता. हे प्रजापते, तुझ्यावांचून दुसरा कोणीहि या व त्या सर्व उत्पन्न वस्तूंवर पांखर घालणारा देव नव्हता.' याच मंडलाच्या ८१ व ८२ व्या सूक्तांत याच विश्वात्म्याला विश्वकर्मा हें नांव दिलें आहे तर ९० व्या म्हणजे पुरुषसूक्तांत त्यालाच पुरुष म्हटलें आहे. असो. मात्र उपनिषत्कालीन आत्मैकत्व व ऋग्वेदकालीन आत्मैकत्व यांत एक महत्त्वाचा फरक आहे तो असा: उपनिषत्कालीन तत्त्ववेत्त्यांनीं एकट्या ब्रह्माला अगर आत्म्याला सत्य मानलें व इतर सर्व संसाराला अनृत म्हणजे मिथ्या मानलें. आणि म्हणून ऐहिक व पारलौकिक सुखें तुच्छ व त्याज्य मानलीं. एकट्या आत्म्याच्या प्राप्तीसाठीं यमानें देऊं केलेले सर्व सुखोपभोग नचिकेत्यानें नाकारले अशी कठोपनिषदांतील कथा प्रसिद्धच आहे. अशा तऱ्हेची ऐहिक सुखाबद्दलची विरक्ति मात्र ऋग्वेदांत कोठेंहि आढळत नाहीं. उलटपक्षीं ऐहिक सुखोपभोगांची प्राप्ति व दुःखांचा परिहार या दोन ध्येयांच्या पूर्तीसाठींच ऋग्वेदकालीन कवी व ऋषी देवतांची आराधना करतात व या दोन ध्येयांनाच पुरुषार्थ मानतात. मोक्षाला पुरुषार्थ ऋग्वेदांत मानलेला नाहीं. वेदोत्तरकालांत मात्र उपनिषत्कालाचे अखेरीअखेरीला निश्चित झाल्याप्रमाणें ऐहिक जीवन हें मिथ्या, निरर्थक असून शिवाय तें दुःखप्रायहि आहे, अतएव आत्म्याला बंधनकारकहि आहे म्हणून मनुष्यानें त्यांतून

सुटून मुक्त झालें पाहिजे असा निश्चित सिद्धांत मांडला गेला व मोक्षाच्या या अशा कल्पनेमुळें भक्तीच्या स्वरूपांतहि फार मोठा फरक पडला हें आपणांस पुढें दिसेलच. तूर्त ऋग्वेदकालांतील भक्तीचें स्वरूप पूर्णपणें आकलन होण्यासाठीं त्या कालच्या सूक्तद्रष्ट्यांच्या ध्येयभूत पुरुषार्थाबद्दलच्या काय कल्पना होत्या हें आपण त्यांच्याच वचनांवरून पाहूं. यासंबंधीं थोडेंसें दिग्दर्शन वर परिच्छेद ४ च्या प्रारंभींच केलें आहे. त्यांचेंच अधिक विवरण येथें करूं.

६. देवतांकडून कोणत्या इष्ट वस्तूंची प्राप्ति व कोणत्या अनिष्ट गोष्टींचा परिहार वैदिक भक्ताला अपेक्षित होता याचें उत्तम व थोडक्यांत स्पष्टीकरण जेथें भक्त आपण स्वतःच देव असतों तर आपल्या भक्ताला आपण काय दिलें असतें व कसें वागवलें असतें याचें वर्णन करतो त्या ऋचांवरून फार उत्तम होतें. यासाठीं अशा ऋचांचा अगोदर विचार करूं. एक कवि अग्नीला म्हणतो :

**यदग्ने मर्त्यस्त्वं स्यामहं मित्रमहो अमर्त्यः ।**
**सहसः सूनवाहुत ॥ २५ ॥**
**न त्वा रासीयाभिशस्तये वसो । न पापत्वाय सन्त्य ।**
**न मे स्तोतामतीवा न दुर्हितः । स्यादग्ने न पापया ॥ २६ ॥**
**पितुर्न पुत्रः सुभृतो दुरोण आ । देवाँ एतु प्र णो हविः ॥ २७ ॥**

अर्थ : 'जर, हे अग्ने, तूं मर्त्य व मी अमर्त्य म्हणजे तुझ्या जागीं देव असतों तर, हे सामर्थ्यपुत्रा, लोकांचे शिव्याशाप व करंटेपणा यांची झळ मीं तुला लागूं दिली नसती. माझा कोणताच भक्त भणंग भिकारी, अडचणींत सांपडलेला व करंटा राहिला नसता ! ज्याप्रमाणें मुलगा आपल्या बापाच्या घरीं उत्तम रीतीनें पालनपोषण होऊन सुखानें राहतो तसा तूं माझ्या छायेखालीं राहिला असतास. म्हणून आमचें हें हवि (तुझ्यामार्फत)

देवांप्रत जावो.' (८.१९.२५-२७). तसेंच एक वसिष्ठ कवि इंद्राला काय म्हणतो तें पहा :

**यदिन्द्र यावतस्त्वमेतावदहमीशीय ।**
**स्तोतारमिद्दिधिषेय रदावसो न पापत्वाय रासीय ॥ १८ ॥**
**शिक्षेयमिन्महयते दिवेदिवे राय आ कुहचिद्विदे ।**
**न हि त्वदन्यन्मघवन्न आप्यं वस्यो अस्ति पिता च न ॥ १९ ॥**

अर्थ : 'हे खणधन्या, जर तुझ्याएवढ्या संपत्तीचा मालक मी असतों तर मी त्यांतून माझ्या स्तोत्याला म्हणंजे भक्तालाच मदत केली असती व त्याला करंटेपणाच्या स्वाधीन केला नसता ! माझ्या पूजकाला रोजच्या रोज वाटेल तेथें उपलब्ध होणारी संपत्ति मिळविण्याचें सामर्थ्य दिलें असतें. हे देवा, आम्हांला तुझ्याखेरीज दुसरें अधिक प्रेमळ नातेवाईक माणूस—पिता धरून देखील—कोणीच नाहीं (म्हणून मी असें म्हणतों). (७.३२.१८-१९). दुसरा एक कवि इन्द्राला म्हणतो :

**यदिन्द्राहं यथा त्वमीशीय वस्व एक इत् ।**
**स्तोता मे गोषखा स्यात् ॥ १ ॥**
**शिक्षेयमस्मै दित्सेयं शचीपते मनीषिणे ।**
**यदहं गोपतिः स्याम् ॥ २ ॥**

अर्थ : 'जर मी तुझ्यासारखा सर्व संपत्तीचा एकटाच मालक असतों, तर माझा भक्त गाईंच्या खिल्लारांत दंग होऊन राहता ! जर मी (तुझ्यासारखा) संपन्न असतों तर मी, हे शचीपते, माझ्या स्तुतिपाठकाला सामर्थ्यसंपन्न करून त्याला वाटेल तें देण्यास उत्सुक झालों असतों.' आणखी एक कवि अशाच तऱ्हेची प्रार्थना अग्नीला दुसऱ्या एका ठिकाणीं करितो. (८.१४.१-२).

**यदग्ने स्यामहं त्वं त्वं वा घा स्या अहम् ।**
**स्युष्टे सत्या इहाशिषः ॥ २३ ॥**

अर्थ : 'हे अग्ने, जर तूं माझ्या जागीं असतास व मी तुझ्या जागीं असतों

तर तुझ्या सर्व इच्छा परिपूर्ण झाल्या असत्या.' (८.४४.२३). तसेंच मरुत देवांना उद्देशूनहि एक कवि म्हणतो :

**यद्यूयं पृश्निमातरो मर्तासः स्यातन ।**
**स्तोता वो अमृतः स्यात् ॥ ४ ॥**
**मा वो मृगो न यवसे जरिता भूदजोष्यः ।**
**पथा यमस्य गादुप ॥ ५ ॥**

अर्थ : 'हे पृश्निपुत्रांनो, जर तुम्ही माझ्यासारखे मर्त्य असतां आणि मी तुमचा भक्त तुमच्याप्रमाणें अमर्त्य असतों तर—(असो, जास्ती सांगत नाहीं; प्रार्थना एवढीच कीं), तुमचा हा स्तुतिपाठक भक्त एकाद्या राखीव कुरणांत शिरलेल्या रानटी जनावराप्रमाणें तुम्हांला अप्रिय होऊं देऊं नका. तो यमानें आंखून दिलेल्या मार्गानें आपल्यापाशीं येवो.' (१.३८.४-५). आतां स्वतंत्र रीतीनेंच आपल्या इष्ट देवतेपाशीं काय काय गोष्टी कवी मागतात तें पाहूं—

**इन्द्र श्रेष्ठानि द्रविणानि धेहि चित्तिं दक्षस्य सुभगत्वमस्मे ।**
**पोषं रयीणामरिष्टिं तनूनां स्वाद्मानं वाचः सुदिनत्वमह्नाम् ॥**

अर्थ : 'हे इंद्रा, आम्हांस श्रेष्ठ जातीची त्रिविध संपत्ति, बुद्धिमत्ता, कामाचा सुबकपणा, द्रव्याची वाढ, शरीराचें आरोग्य, वाणीची रसाळता व दिवसांची अनुकूलता दे.' (२.२१.६). तसेंच :

**अश्वी रथी सुरूप इद् गोमाँ इदिन्द्र ते सखा ।**
**श्वात्रभाजा वयसा सचते सदा चन्द्रो याति सभामुप ॥**

अर्थ : 'हे इन्द्रा, तुझा आवडता भक्त अश्वांचा, रथांचा, गाईंचा मालक बनून सुंदर स्वरूप देखील प्राप्त करून घेतो. पूर्णत्वास पोंचलेल्या जोमदारपणाचा सदैव उपभोग घेऊन सर्वांच्या चित्तास आल्हाद देत देत तो विद्वानांच्या सभेंत प्रवेश करतो.' (८.४.९). दुसरा एक कवि म्हणतो :

**आ नो भर व्यञ्जनं गामश्वमभ्यञ्जनम् ।**
**सचा मना हिरण्यया ॥ २ ॥**
**उत नः कर्णशोभना पुरूणि धृष्णवा भर ।**
**त्वं हि शृण्विषे वसो ॥ ३ ॥**

अर्थ : 'आम्हांला उठून दिसणारे अलंकार, गाई, घोडे, अभ्यञ्जन, व त्याचेबरोबरच सोन्याप्रमाणें निर्मळ अशी प्रतिभा दे. तसेंच आम्हांल कानाला शोभा देणारे पुष्कळसे अलंकार दे. कारण तुझी (दातृत्वाबद्दल) प्रसिद्धीच आहे.' (८.७८.२-३). त्याचप्रमाणें अन्य कवि काय मागतो तें पाहा :

**नू गृणानो गृणते प्रत्न राजन् इषः पिन्व वसुदेयाय पूर्वीः ।**
**अप ओषधीरविषा वनानि गा अर्वतो नॄनृचसे रिरीहि ॥**

अर्थ : 'आतां स्तुतीनें संतुष्ट होऊन, हे पुराणपुरुषा व राजा, तूं आपल्या भक्तासाठीं, म्हणजे त्याला धनधान्याच्या देणग्या मिळाव्या म्हणून, पुष्कळसे अन्नधान्याचे सांठे जिकडे तिकडे वाढव. तसेंच त्याला भरपूर पाणवठे, वनस्पती, विषारी नसलेलीं झाडेंझुडपें, गाई, घोडे, नोकरमाणसें दे, कीं ज्या योगानें तो तुझे गुण गाईल.' (६.३९.५). आणखी पाहा :

**उत नः पितुमा भर संरराणो अविक्षितम् ।**
**मघवन् भूरि ते वसु ॥ ८ ॥**
**उत नो गोमतस्कृधि हिरण्यवतो अश्विनः ।**
**इळाभिः सं रभेमहि ॥ ९ ॥**

अर्थ : 'आणखी आम्हांला संतुष्ट होत्साता, कधींहि न संपणारें अन्न दे. कारण, हे दानशूरा, तुझी संपत्ति अलोट आहे. आणि शिवाय आम्हांला गाई, सुवर्ण व घोडे यांचे मालक कर. पौष्टिक खाद्यपेयें आमच्या हस्तगत होऊं देत.' (८.३२.८-९). तसेंच—

**यत्त्वा यामि दद्धि तन्न इन्द्र बृहन्तं क्षयमसमं जनानाम् ।**

अर्थ : 'हे इन्द्रा, जें मी तुझ्याजवळ मागतों तें म्हणजे ज्या तऱ्हेचें सामान्य लोकांना उपलब्ध होणार नाहीं अशा तऱ्हेचें विस्तीर्ण निवासस्थान मला दे.' (१०.४७.८). आणि—

**अस्माकमुत्तमं कृधि श्रवो देवेषु सूर्य । वर्षिष्ठं द्यामिवोपरि ॥**

अर्थ : 'हे सूर्या, आमची कीर्ति श्रेष्ठ व द्युलोकाप्रमाणें उच्चतम अशी करून तिला देवांपर्यंत नेऊन पोंचव.' (४.३१.१५). आणखी पाहा :

**गोभिष्टरेमामतिं दुरेवां यवेन क्षुधं पुरुहूत विश्वाम् ॥**

अर्थ : 'हे पुरुहूता इन्द्रा, गाईंच्या योगानें दुष्ट दारिद्र्य व धान्याच्या योगानें सर्व प्रकारचा दुष्काळ आम्हीं तरून जावें.' (१०.४२.१०). त्याचप्रमाणें—

**स त्वं न इन्द्र सूर्ये सो अप्स्वनागास्त्व आ भज जीवशंसे ।**
**मान्तरां भुजमा रीरिषो नः श्रद्धितं ते महत इन्द्रियाय ॥**

अर्थ : 'हे इन्द्रा, अशा प्रकारचा जो तूं तो आम्हांस सूर्यप्रकाश, पाण्याचे सांठे व नद्या, निर्दोषत्व व लोकप्रियता या गोष्टींत सहभागी कर. आमच्या अंतरींच्या आवडत्या भोगांचा नाश करूं नकोस. तुझ्या अद्वितीय मोठ्या सामर्थ्यावर आमचा दृढ विश्वास आहे.' (१.१०४.६). अशा तऱ्हेनें दुसऱ्या अनेक कवींच्या प्रार्थनेंतून ऐहिक ऐश्वर्याचे घटक म्हणजे गाई, घोडे, रथ, सोनें, शूर पुत्र व अनुयायी, शेतें व कुरणें, घरेंदारें, नांवलौकिक, ताकद, काटकपणा, पौरुष, पराक्रम, दीर्घायुष्य, स्त्रिया वगैरेबद्दलची अपेक्षा व याचना दिसून येते. तसेंच अनिष्ट गोष्टी म्हणजे अकालीं मरण, रोगराई, अज्ञान, दुसऱ्यांचे आक्रोश व शिव्याशाप, दारिद्र्य म्हणजे अन्नवस्त्रादिकांचा अभाव, अन्नान्नदशा, दुष्टबुद्धि वगैरेच्या परिहाराबद्दलहि वारंवार प्रार्थना आढळून येते. पाहा :

**त्वं नो अस्या अमतेरुत क्षुधः अभिशस्तेरव स्पृधि ॥**

अर्थ : 'तूं आम्हांला या दारिद्र्यांतून, अन्नान्नदशेंतून व शिव्याशापांतून तरून ने.' (८.६६.१४). तसेंच—

**मा नो अग्नेऽवीरते परा दा दुर्वाससेऽमतये मा नो अस्यै ।**
**मा नः क्षुधे मा रक्षस ऋतावो मा नो दमे मा वन आ जुहूर्थाः ॥**

अर्थ : 'हे पवित्र अग्ने, आम्हांला तूं पुत्रसंतानाचा अभाव, कपड्यालत्त्याचें दुर्भिक्ष, अशा तऱ्हेचें हें भयाण दारिद्र्य, दुष्काळ, राक्षस इत्यादि गोष्टींकडे लोटून देऊं नकोस. आम्हांस घरीं अगर बाहेर अरण्यांत कोठेंहि वाकड्या मार्गाला लावूं नकोस.' (७.१.१९). त्याचप्रमाणें—अकालीं मरण, शत्रूकडून युद्धांत पराभव व अनेक तऱ्हेच्या शारीरिक व्याधी यांचा उगम देवतांच्या रोषांत आहे अशा कल्पनेनें चोखंदळ व उग्र अशा वरुण, रुद्र वगैरे देवतांच्या रोषाचें देखील अनिष्ट गोष्टींतच परिगणन केलें आहे. या उग्र देवतांचा रोष होण्याचीं कारणें ऋग्वेदसूक्तांत स्पष्टपणें कोठेंच प्रायशः उल्लेखिलेलीं नाहींत. फक्त सर्वसाधारणपणें प्रमुख देवतांचीं प्रत्येकीं कांहीं व्रतें म्हणजे नियम आहेत व त्यांचें उल्लंघन केल्यास त्या त्या देवता रुष्ट होऊन नियमांचें उल्लंघन करणारास साक्षात् अगर परंपरेनें शिक्षा करतात अशी कल्पना पुष्कळ ठिकाणीं आढळते. मात्र हीं व्रतें कोणतीं व त्यांचा भंग आपल्या हातून कसा, कोठें व केव्हां झाला याची कल्पना कर्तींनाहि नीटशी आलेली दिसत नाहीं. वरुणाच्या लाडक्या वसिष्ठ ऋषीला देखील याचा उलगडा झालेला नाहीं. अत्यंत काकुळतीस येऊन तो म्हणतो :

**उत स्वया तन्वा सं वदे तत् कदान्वन्तर्वरुणे भुवानि ।**
**किं मे हव्यमहृणानो जुषेत कदा मृळीकं सुमना अभि ख्यम् ॥ २ ॥**
**पृच्छे तदेनो वरुण दिदृक्षु उपो एमि चिकितुषो विपृच्छम् ।**
**समानमिन्मे कवयश्चिदाहुः अयं ह तुभ्यं वरुणो हृणीते ॥ ३ ॥**
**किमाग आस वरुण ज्येष्ठं यत्स्तोतारं जिघांससि सखायम् ।**

**प्र तन्मे वोचो दूळभ स्वधावो अव त्वानेना नमसा तुर इयाम् ॥ ४ ॥**
**न स स्वो दक्षो वरुण ध्रुतिः सा सुरा मन्युर्विभीदको अचित्तिः ।**
**अस्ति ज्यायान्कनीयस उपारे स्वप्नश्चनेदनृतस्य प्रयोता ॥ ६ ॥**

अर्थ : 'आणि स्वतःपाशींच मी विचार करीत राहतों कीं, मी केव्हां बरें वरुणाच्या सांनिध्यांत जाईन ? मीं दिलेलें कोणतें हव्य रागावल्यावांचून वरुण स्वीकारील ? प्रसन्न मनानें मीं केव्हां त्याच्या दयेचा अनुभव घेईन ? चार जाणत्या लोकांत जाऊन मीं माझ्या अपराधाबद्दल चौकशी केली; शिवाय याच गोष्टीची शहानिशा करण्यासाठीं पुष्कळ विद्वान् लोकांकडे जाऊन आलें. (परंतु) याच गोष्टीसाठीं चांगल्याचांगल्या कवींकडे गेलों तर ते देखील (इतरांप्रमाणेंच) एकच गोष्ट बोलतात कीं, "हा वरुण तुझ्यावर रागावला आहे खास! (कां व कसा हें मात्र सांगतां येत नाहीं)." मग आतां तुझें तूंच मला सांग कीं, असा काय घोर अपराध माझ्या हातून घडला आहे कीं ज्याच्या योगानें तुझ्या आवडत्या भक्ताला तूं ठार मारूं पाहात आहेस! तो अपराध कळला म्हणजे मी आपली चूक सुधारून निरपराध होऊन लोटांगण घालीत तुझ्याकडे धावत येईन. (शिवाय असें पाहा कीं कांहीं अपराध माझ्या हातून झाला असला तरी देखील तो मी बुद्धिपुरःसर व दांडगेपणानें केलेला नाहीं. ज्या योगानें अपराध झाला असेल) ती माझी स्वतःची अक्कलहुशारी नव्हे; तें दैव आहे; कदाचित् (मूर्खपणानें सेवन केलेली) सुरा, तीव्र क्रोध, द्यूत व अज्ञान वगैरेहि त्याला कारणीभूत असतील. तथापि जर वडीलधारीं माणसें जवळ असतांना लहान मुलानें कांहीं अपराध केला तर त्यांत वडील माणसांचा थोडा तरी वांटा असतोच ना ? (जागेपणाची गोष्ट एक राहूं दे, परंतु) स्वप्नांतदेखील माणसाच्या हातून अपराध होणें चुकत नाहीं (कीं ज्या वेळीं माणसाला स्वतःची बुद्धि वापरणें अशक्यच असतें; तात्पर्य, सर्वच अपराधांची जबाबदारी माझ्यावर ढकलणें योग्य होणार

नाहीं). ' (७.८६.२,३,४,६). देवतांच्या रोषानें झालेली साक्षात् शिक्षा म्हणजे जलोदरासारखे रोग, अकालीं मरण, अंगीकृत कार्यांत अपयश, वृथा श्रम व वृथा भीति आणि शत्रूंशीं चाललेल्या लढाईंत पराजय अशी कवींची भावना होती. विशेषेंकरून लढणारे दोनहि पक्ष आर्य असले म्हणजे ज्या पक्षाच्या लोकांनीं व्रतभंग करून देवतांचा व मुख्यतः वरुणाचा व तदनुषंगानें इतर आदित्यांचा रोष आपणांवर ओढवून घेतला असेल त्या पक्षाचा हटकून पराभव व्हावयाचाच अशा कल्पनेमुळें एका वसिष्ठ कवीनें इंद्राची मदतीसाठीं प्रार्थना करतां करतांच त्याचेमार्फत वरुणाला आपणांत त्याला म्हणजे वरुणाला दिसत असलेला खोटेपणा, अनृत, अपराध, व्रतभंग वगैरे छाटून टाकण्याची प्रार्थना केली आहे. खालीं दिलेलीं उदाहरणें पाहा :

**यदेमि प्रस्फुरन्निव दृतिर्न ध्मातो अद्रिवः । मृळा सुक्षत्र मृळय ॥**
**क्रत्वः समह दीनता प्रतीपं जगमा शुचे । मृळा सुक्षत्र मृळय ॥**
**अपां मध्ये तस्थिवांसं तृष्णाविदज्जरितारम् । मृळा सुक्षत्र मृळय ॥**

अर्थ : ' ज्या अर्थीं मी अतिशय फुगवलेल्या व म्हणून फुटण्याच्या बेतांत असलेल्या कातड्याच्या पोकळ पिशवीप्रमाणें चालतांना दिसतों, त्या अर्थीं तूं मजवर दया कर. अकलेच्या दारिद्र्यामुळें मीं एकदम तुझ्या विरुद्ध वर्तन केलें; जिकडे तिकडे पाणीच पाणी अशा ठिकाणीं राहिलों तरीहि या तुझ्या स्तोत्याला भयंकर तहानेनें पछाडलेंच !' (७.८९.२,३,४). तसेंच—

**वि मच्छ्रथाय रशनामिवाग ऋध्याम ते वरुण खामृतस्य ।**
**मा तन्तुश्छेदि वयतो धियं मे मा मात्रा शार्यपसः पुर ऋतोः ॥**

अर्थ : ' बंधनाप्रमाणें असलेले माझे अपराध माझ्यापासून दूर कर; तुझे सर्व नियम आमचेकडून पालन केले जावोत. मी तुझें स्तुतिवस्त्र विणीत असतां त्याचा धागा तुटूं देऊं नकोस. पुरें होण्यापूर्वीं माझ्या अंगीकृत कार्याचा झालेला अंश नष्ट होऊं देऊं नकोस. ' (२.२८.५). आणखी पाहा :

**मा युष्मावत्स्वापिषु श्रमिष्म ।**

अर्थ : '(हे देवांनो,) तुमच्यासारखे थोर बांधव असतां आम्हांस वृथा श्रम होऊं देऊं नको.' (२.२९.४).

**मा भेम मा श्रमिष्म उग्रस्य सख्ये तव ।**

अर्थ : ' (हे इन्द्रा,) तुझ्यासारख्या उग्र देवाशीं सख्य असतांना आम्हांला कोठल्याहि तऱ्हेची भीति अगर वृथा श्रम न होवोत.' (८.४.७). त्याचप्रमाणें—

**एभिर्न इन्द्राहभिर्दशस्य दुर्मित्रासो हि क्षितयः पवन्ते ।**
**प्रति यच्चष्टे अनृतमनेनाः अव द्विता वरुणो मायी नः सात् ॥**

अर्थ : ' हे इन्द्रा, या दिवसांत तूं आमच्यावर मेहरबानी कर. कारण, आमचे दुष्ट प्रतिस्पर्धी लोक आज आत्मशुद्धि करीत आहेत. ( म्हणून तूं असें घडवून आण कीं ) अपराध सहन न करणारा अद्भुतसामर्थ्यवान् वरुण आमच्यामधील दिसेल तो खोटेपणा साफ नष्ट करून टाकील ! (ज्या योगानें आमच्या शत्रूंबरोबर लढतांना आमचा निभाव लागेल.)' (७.२८.४).

देवतेच्या रोषानें परंपरेनें झालेली शिक्षा म्हणजे आपल्या हिंसक, दुष्ट, द्वेष करणाऱ्या उद्दाम शत्रूच्या हातांत सांपडणें; तसेंच निर्ऋति, द्रुह्, रक्षस्, दुर्हणा वगैरे क्षुद्र अतिमानुष पापयोनींच्या तावडींत जाणें ही होय. पाहा :

**मा नो अग्नेऽव सृजो अघाय अविष्यवे रिपवे दुच्छुनायै ।**
**मा दत्वते दशते मादते नो मा रीषते सहसावन् परा दाः ॥**

अर्थ : 'आपलें वर्चस्व गाजवूं पाहणाऱ्या अशा दुष्ट शत्रूला अगर दौर्भाग्यदेवतेला तूं आम्हांला देऊन टाकूं नकोस; तसेंच, तीक्ष्ण दांत असणाऱ्या, दंश करणाऱ्या, गिळून टाकणाऱ्या किंवा दुखापत करणाऱ्या श्वापदांच्या तावडींत आम्हांला जाऊं देऊं नकोस.' (१.१८९.५).

**मो षु णः परापरा निर्ऋतिर्दुर्हणा वधीत् । पदीष्ट तृष्णया सह ।**

अर्थ : 'फार दूर राहणारी व क्रूरपणें मारणारी निर्ऋति आम्हांला न मारो; आमच्या तृष्णेच्या विकाराबरोबरच ती दूर जावो.' (१.३८.६).

**द्रुहः सचन्ते अनृता जनानां न वां निण्यान्यचित्ते अभूवन्।**

अर्थ : 'द्रुह् नांवाच्या अनिष्ट देवता लोकांच्या खोट्या कर्मांना बिलगतात; (व खोटीं कर्में लपवूं म्हटलें तर) कोणत्याहि गुप्त गोष्टी तुम्हांला कळत नाहींत असें होतच नाहीं.' (७.६१.५).

देवांनीं व्रतें निर्माण केलीं व तीं त्यांनीं अंमलबजावणीसाठीं अग्नीच्या स्वाधीन केलीं. पाहा—

**त्वे विश्वा संगतानि व्रता ध्रुवा यानि देवा अकृण्वत।**

तसेंच

**यद्वो वयं प्रमिनाम व्रतानि विदुषां देवा अविदुष्टरासः।**
**अग्निष्टद्विश्वमा पृणाति विद्वान् ॥**

अर्थ : 'हे अग्ने, देवांनीं जीं कधीं न ढळणारीं व्रतें निर्माण केलीं तीं सर्व तुझ्या ठिकाणीं एकत्रित झालीं आहेत.' (१.३६.५). 'हे देवांनो, अधिक अडाणी अशा आम्हीं जर तुम्हां विद्वानांच्या व्रतांचा भंग केला तर हा विद्वान् अग्नि त्या सर्वांची भरपाई करील.' (१०.२.४). मित्र, वरुण, अग्नि, इन्द्र व सविता यांनीं घालून दिलेल्या व्रतांचा व याच देवतांचा 'व्रतपा' म्हणून निर्देशहि ऋग्वेदांत अनेकवार सांपडतो. तथापि या सर्वांत एकट्या वरुणालाच धृतव्रत अशी पदवी बहाल केली आहे. या दैवताजवळ हृदयाची कोंवळीक अगर अपराधाकडे दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ति फारच कमी आहे अशी सूक्तद्रष्ट्यांची ठाम समजूत दिसते. यामुळेंच त्यांना त्याची फारच भीति वाटत होती यांत शंका नाहीं. व्रताचें उल्लंघन झालें रे झालें कीं ताबडतोब शिक्षा असा या देवतेचा खाक्या! व शिवाय अपराधी म्हणजे व्रतांचें उल्लंघन करणाऱ्या पुरुषाची स्तुति अगर हविर्भाग यांच्याकडे ही देवता ढुंकूनहि पाहावयास तयार नसते, यामुळें तिचा

राग घालवणें फारच कठिण वाटत असे. म्हणून पुष्कळदां उगवता सूर्य, सविता, अग्नि, वगैरे देवतांनीं आदित्यांपाशीं—विशेषतः वरुणाजवळ—या भक्ताचे अपराध बुद्धिपुरःसर केलेले नाहींत म्हणून त्याला निरपराध मानावा अशी मध्यस्थी करावी अशी ऋषींनीं विनंती केली आहे. पाहा :

**अदिते मित्र वरुणोत मृळ यद्वो वयं चकृमा कच्चिदागः ।**
**उर्वश्यामभयं ज्योतिरिन्द्र मा नो दीर्घा अभि नशन् तमिस्राः ॥**

अर्थ : 'हे मित्रा, हे वरुण हे अदिते, जरी आम्हीं तुमचा कांहींहि अपराध केला असला तरीहि तुम्ही आमचेवर दया करा. हे इन्द्रा, विस्तीर्ण व निर्भय अशा सूर्यतेजाचा मला उपभोग लाभो. दीर्घकालीन व अंधःकारपूर्ण अशा रात्रींचा (म्हणजे अकालीं मृत्यूचा) उपसर्ग मला न होवो.' (२.२७.१४). आणखी

**स सूर्य प्रति पुरो न उद्गाः एभिः स्तोमेभिरेतशेभिरेवैः ।**
**प्र नो मित्राय वरुणाय वोचो अनागसो अर्यम्णे अग्नये च ॥**

अर्थ : 'हे सूर्या, या आमच्या स्तोत्रांच्या सामर्थ्यानें, तुझ्या घोड्यांच्या जोरावर, (अगर) आपल्याच मर्जीप्रमाणें, तूं आमच्या पुढें उदयाला ये; व मित्र, वरुण, अर्यमा व अग्नि यांना आम्ही निरपराधी आहोंत असें उद्घोषित कर.' (७.६२.२). शिवाय

**अचिती यच्चकृमा दैव्ये जने दीनैर्दक्षैः प्रभूती पूरुषत्वता ।**
**देवेषु च सवितर्मानुषेषु च त्वं नो अत्र सुवतादनागसः ॥**

अर्थ : 'जर आम्हीं अज्ञानानें, मूर्खपणानें, ऐश्वर्यमदानें किंवा मनुष्यधर्म म्हणून देवांविरुद्ध कांहीं अपराध केला असेल तर देवांसमोर व माणसांसमोर आम्हीं निरपराधी आहोंत असें तूं, हे सवित्या, अधिकारवाणीनें सांग.' (४.५४.३). तसेंच—

**मित्रो नो अत्रादितिरनागान् सविता देवो वरुणाय वोचत् ।**

अर्थ : 'मित्र, अदिति व सविता देव हे आम्ही निरपराधी आहोंत असें

वरुणाजवळ प्रतिपादन करोत.' (१०.१२.८). व्रत शब्दाप्रमाणेंच धाम शब्दाचा उपयोगहि ऋग्वेदांत देवांनीं घालून दिलेले नियम या अर्थी अनेकदां केला आहे. पाहा :

**कदा ते मर्ता अमृतस्य धाम इयक्षन्तो न मिनन्ति स्वधावः ।**

अर्थ : 'हे आपल्या मर्जीप्रमाणें चालणाऱ्या देवा, यज्ञ करूं इच्छिणारे पुरुष अमर्त्य असा जो तूं (इन्द्र) त्याच्या नियमांचें उल्लंघन केव्हांहि करीत नाहींत.' (६.२१.३). तसेंच—

**प्र ताँ अग्निर्बभसत्तिग्मजम्भस्तपिष्ठेन शोचिषा यः सुराधाः ।**
**प्र ये मिनन्ति वरुणस्य धाम प्रिया मित्रस्य चेततो ध्रुवाणि ॥**

अर्थ : 'जे लोक वरुणाच्या व जाणत्या मित्राच्या आवडत्या नियमांचें उल्लंघन करतात त्यांना तीक्ष्ण दाढा असलेला (परंतु) उदारधी असा अग्नि आपल्या अत्यंत प्रखर तेजानें जाळून टाको.' (४.५.४). पुढील ऋचेंत धर्म शब्दाचा अर्थहि व्रत व धाम शब्दांप्रमाणेंच आहे :

**अचित्ती यत्तव धर्मा युयोपिम मानस्तस्मादेनसो देव रीरिषः ।**

अर्थ : '(हे वरुणा,) जर आम्हीं अजाणतेपणानें तुझ्या नियमांचें उल्लंघन केलें तर त्या अपराधाबद्दल, हे देवा, तूं आम्हांला शिक्षा करूं नकोस.' (७.८९.५).

७. येथपर्यंत ऋग्वेद सूक्तांतून आढळून येणाऱ्या ऐहिक सुखोपभोगांची प्राप्ति व अनिष्ट गोष्टींचा परिहार या ध्येयांबद्दल अथवा पुरुषार्थांबद्दल चर्चा केली. मरणोत्तर जीवनाबद्दल व विशेषतः तेथें प्राप्त होणाऱ्या सुखांबद्दल अथवा टाळतां येण्याजोग्या दुःख व अनर्थांबद्दल ऋग्वेदसूक्तांतील उल्लेख एकंदरीनें फारच थोडे आहेत. त्यांतले बरेचसे स्वर्गलोक, अमृतलोक, यमलोक अगर विष्णुलोक इत्यादि निरनिराळ्या नांवांनीं उल्लेखिलेल्या एका परमोच्च व नित्य अशा स्थानाबद्दलचे आहेत. या

स्थानाबद्दल अशी कल्पना आहे कीं, त्या ठिकाणीं निरंतर प्रकाश असून तें अविनाशी आहे. तेथें सर्व तऱ्हेच्या इच्छा तृप्त होऊन स्वातंत्र्य आणि संतोषहि प्राप्त होतात. पाहा:

**यत्र ज्योतिरजस्रं यस्मिन्लोके स्वर्हितम् ।**
**तस्मिन्मां धेहि पवमानामृते लोके अक्षित ॥ ७ ॥**
**यत्र राजा वैवस्वतो यत्रावरोधनं दिवः ।**
**यत्रामूर्यह्वतीरापस्तत्र माममृतं कृधि ॥ ८ ॥**
**यत्रानुकामं चरणं त्रिनाके त्रिदिवे दिवः ।**
**लोका यत्र ज्योतिष्मन्तस्तत्र माममृतं कृधि ॥ ९ ॥**
**यत्र कामा निकामाश्च यत्र ब्रध्नस्य विष्टपम् ।**
**स्वधा च यत्र तृप्तिश्च तत्र माममृतं कृधि ॥ १० ॥**
**यत्रानन्दाश्च मोदाश्च मुदः प्रमुद आसते ।**
**कामस्य यत्राप्ताः कामास्तत्र माममृतं कृधि ॥ ११ ॥**

अर्थ : 'हे पवमाना, जेथें कधींहि न ढळणारें तेज राहतें व ज्या ठिकाणीं सूर्याचें निवासस्थान आहे, त्या मरणरहित व क्षयहीन अशा लोकांत मला स्थान दे. जेथें वैवस्वत यम हा राजा आहे, जें द्युलोकाची परमावधि आहे व ज्या ठिकाणीं या मोठ्या जलाशयांचें माहेरघर आहे, त्या लोकांत मला नेऊन मरणधर्मरहित असा कर. जेथें म्हणजे द्युलोकाच्या परमोच्च स्थानांत प्रत्येकाला आपल्या इच्छेप्रमाणें राहतां येतें, व ज्या ठिकाणीं सर्व प्रदेश तेजस्वी असतात तेथें मला नेऊन मरणधर्मरहित कर. जेथें सर्व प्रकारच्या इच्छा व अभिलापा पूर्ण होतात, ज्या ठिकाणींच सूर्यलोकहि आहे, जेथें स्वातंत्र्य व तृप्ति वास करतात तेथें मला नेऊन मरणधर्मरहित कर. जेथें सर्व तऱ्हेचे लहानमोठे आनन्द वास करून आहेत व ज्या ठिकाणीं कामाचाहि काम प्राप्त होतो तेथें मला नेऊन मरणधर्मरहित कर.' (९.११३.७-११). दुसऱ्या एका सूक्तांत

याच स्थानाला विष्णूचें उच्चतम स्थान असें म्हणून व येथें एक अत्यंत गोड पेयाचा निरंतर वाहणारा असा झरा आहे असें म्हटलें आहे. पाहा :

**तदस्य प्रियमभि पाथो अश्यां नरो यत्र देवयवो मदन्ति ।**
**उरुक्रमस्य स हि बन्धुरित्था विष्णोः पदे परमे मध्व उत्सः ॥ ५ ॥**
**ता वां वास्तून्युश्मसि गमध्यै यत्र गावो भूरिशृङ्गा अयासः ।**
**अत्राह तदुरुगायस्य वृष्णः परमं पदमव भाति भूरि ॥ ६ ॥**

अर्थ : 'ज्या ठिकाणीं भक्तलोक आनंदांत कालक्रमण करितात तें या विष्णूचें आवडतें स्थान मला प्राप्त होवो. कारण याच ठिकाणीं त्या उरुक्रम विष्णूचें सख्य प्राप्त होतें व या त्याच्या परमोच्च स्थानावर एक अत्यंत गोड पेयाचा—अमृताचा—निरंतर वाहणारा झरा आहे. ज्या ठिकाणीं न दमणारे व बहुशृंगी (उषादेवीच्या रथाला जोडले जाणारे) गाईबैल राहतात त्या प्रदेशांतील प्रासादांत राहण्यासाठीं तुम्हीं उभयतां (यजमान व पत्नी) जावें अशी आमची इच्छा आहे. आणि याच ठिकाणीं उरुगाय अशा पराक्रमी विष्णूचें परमोच्च निवासस्थान आपल्या दिव्य तेजानें तळपत असतें.' (१.१५४.५,६). अशाच तऱ्हेची माहिती यमलोकाबद्दल पुढील ऋचांत मिळते.

**प्रेहि प्रेहि पथिभिः पूर्व्येभिः यत्रा नः पूर्वे पितरः परेयुः ।**
**उभा राजाना स्वधया मदन्ता यमं पश्यासि वरुणं च देवम् ॥ ७ ॥**
**सं गच्छस्व पितृभिः सं यमेन इष्टापूर्तेन परमे व्योमन् ।**
**हित्वायावद्यं पुनरस्तमेहि सं गच्छस्व तन्वा सुवर्चाः ॥ ८ ॥**

अर्थ : '(मृताला उद्देशून कवि म्हणतो :) पुरातन कालापासून चालू असलेल्या मार्गांवरून तूं पुढें पुढें जात राहा; तेथेंच आपले प्राचीन पूर्वज गेलेले आहेत. तेथें गेल्यानंतर स्वतंत्र रीतीनें विहार करणाऱ्या यम व वरुण या दोन राजांची दृष्टिभेट तुला मिळेल. तसेंच तेथें तूं आपल्या पूर्वजांची गांठ घे; यमराजांना भेट व त्या उच्चतम दिव्य लोकांत आपल्या पूर्वार्जित

पुण्याची शिदोरी स्वाधीन करून घे. (मर्त्यत्वाला चिकटून असणाऱ्या) सर्व दोषांचा त्याग करून पुनः तूं आपल्या (कायमच्या) घरीं जा व (अग्नीच्या कृपेनें तेथील भोग भोगण्यासाठीं) तेजस्वी बनून दिव्य देहाची प्राप्ति करून घे.' (१०.१४.७,८). तसेंच पुढील ऋचांत या यमलोकाची प्राप्ति कोणाला होते याचेंहि वर्णन आहे. देवापि नांवाच्या नुकत्याच मेलेल्या एका पुण्यवान् पुरुषाला उद्देशून कवि म्हणतो :

**सोम एकेभ्यः पवते घृतमेक उपासते ।**
**येभ्यो मधु प्रधावति तांश्चिद्देवापि गच्छतात् ॥ १ ॥**
**तपसा ये अनाधृष्याः तपसा ये स्वर्ययुः ।**
**तपो ये चक्रिरे महः तांश्चिद्देवापि गच्छतात् ॥ २ ॥**
**ये युध्यन्ते प्रधनेषु शूरासो ये तनूत्यजः ।**
**ये वा सहस्रदक्षिणाः तांश्चिद्देवापि गच्छतात् ॥ ३ ॥**

अर्थ : 'तेथें कांहीं पूर्वजांच्या घरीं सोमाची नदीच वाहात असते व कांहीं केवळ घृताचेंच सेवन करतात ! हे देवापे, त्यांना व ज्यांच्याकडे दररोज मधाचे झरे वेगानें वाहात येतात त्यांनाहि तूं जाऊन भेट. तपाचरणाच्या योगानें जे शत्रूंना अजिंक्य बनले आहेत व जे स्वर्गाला म्हणजे या तेजस्वी स्थानाला जाऊन पोंचले आहेत; तसेंच तेथेंहि जे तपाचरण करीत आहेत त्या मोठ्या (पूर्वजां-) नाहि तूं भेट. त्याचप्रमाणें (येथें असतांना) ज्यांनीं मोठमोठ्या लढाया मारल्या आहेत; ज्या शूरवीरांनीं आपले देह धारातीर्थीं ठेवले आहेत व ज्यांनीं हजारों (गाई वगैरे) दक्षिणारूपानें दिल्या आहेत, त्यांचीहि गांठ तूं, हे देवापे, त्या ठिकाणीं घे.' (१०.१५४.१-३). आणखीहि पाहा :

**उच्चा दिवि दक्षिणावन्तो अस्थुः ये अश्वदाः सह ते सूर्येण ।**
**हिरण्यदा अमृतत्वं भजन्ते वासोदाः सोम प्र तिरन्त आयुः ॥**
**नाकस्य पृष्ठे अधि तिष्ठति श्रितो यः पृणाति स ह देवेषु गच्छति ।**

**तस्मा आपो घृतमर्षन्ति सिन्धवः तस्मा इयं दक्षिणा पिन्वते सदा ॥**

अर्थ : 'दक्षिणा देणारे (यजमान) उच्च अशा दिव्य लोकांत वास करतात. जे अश्वदान करतात ते सूर्याबरोबर (सूर्यलोकीं) राहतात. सुवर्णदान करणाऱ्यांना अमृत प्राप्त होतें व वस्त्रदान करणारे आपलें आयुष्य वाढवितात. जो देणगी देतो तो देवांत मिसळून स्वर्गाच्या पृष्ठ भागावर निश्चल वास करतो. त्याला नद व नद्या पौष्टिक अन्न प्राप्त करून देतात, व त्याला (त्यानें दिलेली) ही दक्षिणा नेहमीं अधिकाधिक फलप्रद होते.' १०.१०७.२ व १.१२५.५. याच्या उलट जे दुष्टकर्मे, तोंडपुजे, राक्षस वगैरे नीच योनींचे उपासक, तसेंच खोटें बोलणारे व खोटें कर्म करणारे लोक ते तळ नसलेल्या अशा पृथ्वीच्या खालीं एका भयंकर खोल व काळोख्या गर्तेंत पतन पावतात. पाहा :

**परः सो अस्तु तन्वा तना च तिस्रः पृथिवीरधो अस्तु विश्वाः ।**
**प्रति शुष्यतु यशो अस्य देवाः यो नो दिवा दिप्सति यश्च नक्तम् ॥**

अर्थ : 'जो दिवसा व रात्रीं आमचा नाश करूं पाहतो तो स्वतः व त्याची संतति या सर्व तीनहि (एकाखालीं एक असलेल्या) पृथिवींच्या खालीं पतन पावो, आणि त्याचें सर्व यश संकोच पावो.' (७.१०४.११).

तथापि एकंदरीनें एवढें निश्चित कीं, ऋग्वेदांतील ऋषींना स्वर्गलोक अगर नरकलोक या दोहोंहिबद्दल फारशी फिकीर अगर कल्पनाहि नव्हती. त्यांचें सर्व लक्ष ऐहिक सुखें व भोग यांच्यावरच केंद्रित झालें होतें व त्यांच्याच प्राप्तीसाठीं त्यांचे नाना प्रकारचे अविश्रान्त प्रयत्न चालू असत. आपल्या प्रतिस्पर्ध्यांवर मात करून; अथवा इन्द्रादिकांवर अविश्वास करणारे, देवांच्या स्तुतिपाठक ब्राह्मणांना दक्षिणा न देणारे तसेंच त्यांचा व त्यांच्या स्तोत्रांचा द्वेष व मत्सर करणारे जे दस्यु लोक त्यांचा निःपात करून त्यांना लुटून आपणांस त्यांची संपत्ति प्राप्त करून द्यावी म्हणून इन्द्रादिकांची प्रार्थना ऋग्वेदसूक्तांतून पदोपदीं आढळते. तात्पर्य, ऐहिक

जीवनांतील सुखोपभोग व दुःखपरिहार हेंच इतिकर्तव्य अगर उच्च पुरुषार्थ त्या कालीं मानला जात होता व त्यासाठीं अनेक रूपांनीं व निरनिराळ्या गुणांनीं युक्त असलेल्या देवतांच्या रूपानें मनुष्याच्या बुद्धीला प्रादुर्भूत झालेल्या परमतत्त्वाची उपासना, अर्थात् अंतःकरणपूर्वक सेवा हें श्रेष्ठ साधन समजलें जात असे. अशा तऱ्हेची अंतःकरणपूर्वक तळमळीची, जिव्हाळ्याची सेवा हेंच ऋग्वेदांतील भक्तिमार्गाचें तात्त्विक स्वरूप आहे.

८. वरवर पहाणाराला ऋग्वेदकालीन ऋषींची ही सेवा अथवा भक्ति देवाणघेवाण स्वरूपाची म्हणजे बाजारी होती असें वाटण्याचा संभव आहे. याला कारण म्हणजे या ऋषींच्या भाषेंतील सरळपणा, सडेतोडपणा व कोणत्याहि तऱ्हेच्या आडपडद्याचा अभाव हें होय. सोमरस व स्तोम हीं देवतांना अर्पण केलीं असतां त्याच्या मोबदल्यांत देवता आपणांस हव्या असलेल्या वस्तू देतात असा सर्वसाधारण सूक्तांतील भाषेचा मथितार्थ वाटतो. सोमरस हा इन्द्राला अतिशय प्रिय आहे. त्याच्यासाठीं इन्द्र वाटेल तेथें धावेल व वाटेल तें धाडसाचें कृत्य करील अशी सूक्तांच्या वाचनावरून समजूत होते. परंतु जरा विचार केला तर असें आढळून येईल कीं इन्द्रादि देव नुसत्या सोमरसाचे अगर पोकळ स्तुतीचे भुकेले नाहींत. त्या सोमरसाच्या देणगीमागें अथवा स्तोत्रामागें आपलेपणाची भावना असेल तरच इन्द्रादि देव तिकडे वळतील; नाहीं तर ते तिकडे ढुंकूनहि पाहणार नाहींत. नुसत्या श्रीमान् अगर बलाढ्य माणसाशीं इन्द्र संबंध ठेवूं इच्छीत नाहीं. पाहा :

**न रेवता पणिना सख्यमिन्द्रः असुन्वता सुतपाः सं गृणीते ।**
**आस्य वेदः खिदति हन्ति नग्नं वि सुष्वये पक्तये केवलो भूत् ॥**

अर्थ : 'पिळलेल्या सोमरसाची आवड असलेला हा इन्द्र श्रीमान् परंतु

इन्द्रासाठीं सोम न गाळणाऱ्या पणीशीं सख्य कधींच ठेवीत नाहीं. त्याचें सर्वस्व नष्ट करून त्याला वस्त्रहीन करून ठार मारतो. एकट्या सोमरस गाळणाऱ्या व हव्य तयार करणाऱ्या भक्तासाठींच इन्द्र तयार असतो.' (४.२५.७) तसेंच—

**न तं जिनन्ति बहवो न दभ्रा उर्वस्मा अदितिः शर्म यंसत् ।**
**प्रियः सुकृत् प्रिय इन्द्रे मनायुः प्रियः सुप्रावीः प्रियो अस्य सोमी ॥**

अर्थ : 'त्याला (म्ह. पुरुषाला) थोडे अगर पुष्कळ (शत्रू) जिंकूं शकत नाहींत. त्याला अदिति देवता विस्तीर्ण असें संरक्षण देते. कृतीनें, विचारानें पवित्र असणारा व प्रेमळ असा सोमरस अर्पण करणारा पुरुष इन्द्राला अतिशय प्रिय होतो.' (४.२५.५). प्रेमानें, आपुलकीच्या भावनेनें, सोमरस अर्पण करणारा भक्त अशक्त अगर सामर्थ्यवान् असो, इन्द्र त्याच्या मदतीला धावून येतो. एक कवि अभिमानपूर्वक म्हणतो :

**क ईं स्तवत् कः पृणात् को यजाते यदुग्रमिन् मघवा विश्वहावेत् ।**
**पादाविव प्रहरन् अन्नमन्यं कृणोति पूर्वमपरं शचीभिः ॥ १५ ॥**
**परा पूर्वेषां सख्या वृणक्ति वितर्तुराणो अपरेभिरेति ।**
**अनानुभूतीरवधून्वानः पूर्वीरिन्द्रः शरदस्तर्तरीति ॥ १७ ॥**

अर्थ : 'जर उदारधी इन्द्र नेहमींच उग्र (व बलाढ्य) पुरुषांची बाजू घेईल तर त्याचें स्तवन कोण करणार, त्याला हविर्भाग कोण देणार व त्याचें पूजन तरी कोण करील! (अर्थात् कोणीहि इन्द्राला महत्त्व देणार नाहीं.) ज्याप्रमाणें पादचारी पुरुष आपला डावा व उजवा पाय क्रमाक्रमानें एकदां मागें व एकदां पुढें टाकीत जातो, त्याप्रमाणें इन्द्र आपल्या पराक्रमानें निरनिराळ्या मनुष्यांना, एकदां पुढारलेला तर एकदां मागसलेला असा करतो. (केव्हां) पुढारलेल्या पुरुषांची मैत्री व स्नेह-संबंध पार झुगारून देतो, तर केव्हां त्यांची पर्वा न करतां मागसलेल्या भक्तांशीं सख्य करतो. आपली सेवा न करणाऱ्यांना पार धुडकावून लावून

अनेक वर्षेपर्यंत इन्द्र संचार करीत राहतो.' (६.४७.१५,१७). आपल्याजवळ असेल त्यांतलें जास्तींत जास्त व उत्तमांत उत्तम हव्य अगर सोम किंवा देणगी जो ऋषि अथवा योद्धा इन्द्राला देईल त्याच्याबद्दल इन्द्राला आपुलकी उत्पन्न होऊन तो त्याच्या मदतीसाठीं धावेल. आपल्याजवळील जास्तींत जास्त व उत्तमांत उत्तम पदार्थ मनुष्य आपल्या प्रीतिपात्रालाच अर्पण करतो म्हणून अशा तऱ्हेच्या देणगीच्या पाठीमागें प्रेमाची, आपलेपणाची, भक्तीची भावना असतेच याबद्दल शंका बाळगण्याचें कारण नाहीं. तो काळ प्राचीन भारतीयांच्या परस्पर-युद्धाचा असल्यामुळें लढणाऱ्या दोन्ही बाजूंचे लोक मदतीसाठीं -देवांची, विशेषतः इन्द्राची, प्रार्थना करीत असत. तथापि आपल्या प्रतिस्पर्ध्यांना बाजूला ठेवून इंन्द्रानें आपणांकडेच यावें अशी प्रार्थना अनेक कवींच्या सूक्तांतून वारंवार आढळते. केव्हां केव्हां तर वसिष्ठ-वामदेवांसारखे इन्द्राचे आवडते भक्त त्याला हाक मारूं लागले म्हणजे तो इतर ऋषींच्या घरीं सोमपान करीत असला तरी तें टाकून या ऋषींच्या मदतीला धावून येई असें वर्णन आहे. पाहा :

**श्वित्यञ्चो मा दक्षिणतस्कपर्दा धियंजिन्वासो अभि हि प्रमन्दुः ।**
**उत्तिष्ठन्वोचे परिबर्हिषो नॄन् न मे दूरादवितवे वसिष्ठाः ॥ १ ॥**
**दूरादिन्द्रमनयन्ना सुतेन तिरो वैशन्तमति पान्तमुग्रम् ।**
**पाशद्युम्नस्य वायतस्य सोमात्सुतादिन्द्रोऽवृणीता वसिष्ठान् ॥ २ ॥**

अर्थ : 'शुभ्रवेषधारी, उजव्या बाजूस जटाजूट असलेले हे बुद्धीला तेजस्वी बनविणारे वसिष्ठकुलोत्पन्न ऋषी मला नेहमींच अतिशय श्रेष्ठ असा आनंद देत आले आहेत. म्हणून मीं आपल्या दर्भासनावरून उठतां उठतां सभोंवतालच्या लोकांना उद्देशून म्हटलें, इतक्या दूर राहून मला माझ्या वसिष्ठांचें संरक्षण करावयाचें नाहीं.' (असें म्हणून इन्द्र तेथून उठला व वसिष्ठांच्या रक्षणार्थ धावत त्यांचेकडे गेला असें कवि पुढील

ऋचेंत सांगतो.) 'एकदां (दूर देशाच्या) उग्र अशा वैशन्त राजाकडे इन्द्र मनसोक्त सोमपान करीत असतां आपल्या पिळलेल्या सोमाच्या जोरावर वसिष्ठकुलोत्पन्न ऋषींनीं त्याला तेवढ्या दूर अंतरावरून देखील आपल्याकडे आकर्षून घेतलें. तसेंच एकदां पाशद्युम्न वायत नांवाच्या राजानें सोमरस पिळून तयार केला व तो आतां इन्द्राला अर्पण करणार इतक्यांत इन्द्र तेथून उठला व तडक वसिष्ठांकडे जाऊन त्यानें त्यांना पाठीशीं घातलें.' (७.३३.१-२). वामदेव ऋषि तर याच्याहिपुढें जाऊन म्हणतो :

**वि यो ररप्शे ऋषिभिर्नवेभिः वृक्षो न पक्वः सृण्यो न जेता ।**
**मर्यो न योषामभि मन्यमानो अच्छा विवक्मि पुरुहूतमिन्द्रम् ॥**

अर्थ : 'पिकलेल्या फळांनीं भरलेल्या वृक्षाप्रमाणें अगर हातांत सृणि धारण करणाऱ्या विजयी वीराप्रमाणें ज्या इन्द्राच्या सभोंवतीं गराडा देऊन नवीन होतकरू ऋषी त्याच्या मदतीसाठीं ओरडून प्रार्थना करतात त्याच अनेक ठिकाणीं बोलावल्या जाणाऱ्या इन्द्राला, ज्या आत्मविश्वासानें प्रियकर आपल्यावर प्रेम करणाऱ्या प्रेयसीला हाक मारतो त्याच आत्मविश्वासानें मी बोलावतों.' (४.२०.५). एक गृत्समद कवि प्रार्थना करतो :

**हरी नु कं रथ इन्द्रस्य योजमायै सूक्तेन वचसा नवेन ।**
**मो षु त्वामत्र बहवो हि विप्रा नि रीरमन् यजमानासो अन्ये ॥**

अर्थ : 'माझ्या या नवीन सूक्तानें इन्द्रानें मजकडे यावें म्हणून त्याच्या रथाला मीं त्याचे घोडे जोडून दिले आहेत. आतां वाटेंत येतांना पुष्कळ ऋषी व यजमान तुला हाक मारतील; पण देवा, तूं तेथें न थांबतां मजकडे ये.' (२.१८.३). इन्द्र अत्यंत प्रबळ देव आहे; तो अतिशय दानशूर आहे व त्याच्या मोठेपणाचें समग्र वर्णन करणें आपणांला शक्य नाहीं अशी जाणीव कवींना होती. पाहा :

**नहि नु ते महिमनः समस्य न मघवन्मघवत्त्वस्य विद्म ।**
**न राधसोराधसो नूतनस्य इन्द्र नकिर्ददृश इन्द्रियं ते ॥**

अर्थ : 'तुझा संपूर्ण मोठेपणा अगर दानशूरपणा, हे दानशूरा, आम्हांला ठाऊक नाहीं हें उघडच आहे. तशाच तुझ्या रोजच्यारोज दिल्या जाणाऱ्या नव्यानव्या देणग्याहि आम्हांला पूर्णपणें आकलन होत नाहींत. तुझा विशिष्ट प्रभाव कोणींच केव्हांहि पाहिलेला नाहीं.' (६.२७.३). तसेंच दुसरा एक कवि म्हणतो :

**क उ नु ते महिमनः समस्य अस्मत्पूर्व ऋषयोऽन्तमापुः ।**

अर्थ : 'आमच्या कोणत्या पूर्वज ऋषींना तुझ्या संपूर्ण मोठेपणाचा अंत म्हणजे ठाव लागला आहे?' (१०.५४.३). तथापि इंद्र आपला आहे व आपण त्याचे आहोंत या भावनेनें ऋषी त्याला बोलावतात व आपण दिलेली देणगी आवडीनें ग्रहण कर अशी प्रार्थना करतात. पाहा :

**अर्वावतो न आ गहि परावतश्च वृत्रहन् ।**
**इमा जुषस्व नो गिरः ॥ ८ ॥**
**यदन्तरा परावतमर्वावतं च हूयसे ।**
**इन्द्रेह तत आ गहि ॥ ९ ॥**
**वयमिन्द्र त्वायवो हविष्मन्तो जरामहे ।**
**उत त्वमस्मयुर्वसो ॥ ७ ॥**

अर्थ : 'हे वृत्रघातका, जवळच्या प्रदेशांत असशील तर तेथून आमचेकडे ये; दूरच्या प्रदेशांत असशील तर तेथूनहि ये. जरी दूरचा प्रदेश व जवळचा प्रदेश यांच्यामध्यें कोठेंहि (इतर ऋषी) तुला बोलावीत असले तरी तेथून तूं इकडेच ये, व आमच्या या स्तोत्रांचा आवडीनें स्वीकार कर. हे इन्द्रा, आम्ही तुझी आवड करून आहोंत व आपलयाजवळील हव्य घेऊन तुझी आळवणी करीत आहोंत. आणि देवा, तुलाहि आमची आवड आहेच!' (३.४०.८,९;३.४१.७). दुसरा कण्व कवि म्हणतो :

**वयमु त्वा तादिदर्था इन्द्र त्वायन्तः सखायः ।**

अर्थ : 'खरोखर, हे इन्द्रा, आम्ही तुझ्यावर निष्ठा असणारे तुझे सखे,

तेंच एक ध्येय डोळ्यापुढें ठेवून (तुला आळवीत आहों).' (८.२.१६). तसेंच—

**यद्वा मरुत्वः परमे सधस्थे यद् वावमे वृजने मादयासे ।**
**अत आ याह्यध्वरं नो अच्छा त्वाया हविश्चकृमा सत्यराधः ॥ ८ ॥**
**त्वायेन्द्र सोमं सुषुमा सुदक्ष त्वाया हविश्चकृमा ब्रह्मवाहः ।**

अर्थ : 'हे मरुद्गणांच्या नेत्या, जरी तूं परमोच्च लोकांत विहार करीत असलास किंवा या तुझ्या भूतलावरील भक्तांच्या मेळाव्यांत (सोमपानांत) दंग असलास तरी तेथूनहि तूं आमच्या यज्ञाला ये. (कारण) हे अमोघ दात्या, तुझ्यावरील निष्ठेनें आम्हीं हें हव्य तयार केलें आहे. हे उत्तम कार्यकर्त्या, इन्द्रा, तुझ्यावरील निष्ठेनें आम्हीं हा सोम पिळून ठेवला आहे, व हे स्तोत्रवाहना, तुझ्यावरील निष्ठेनें आम्हीं हें हव्य तयार केलें आहे.' (१.१०१.८,९). एक वसिष्ठ कवि काय करावें व काय बोलावें हें न सुचून इन्द्राची प्रार्थना करतो :

**का ते अस्त्यरंकृतिः सूक्तैः कदा नूनं ते मघवन्दाशेम ।**
**विश्वा मतीरा ततने त्वाया अधा म इन्द्र शृणवो हवेमा ॥**

अर्थ : 'हे उदारधे इन्द्रा, माझ्या या कोणत्या सूक्तांनीं तुझी कोणती सेवा होऊं शकेल ? आणि आतां तुला आम्ही केव्हां आपली देणगी द्यावी (तेंच कळत नाहीं). तथापि तुझ्यावर निष्ठा ठेवून माझीं सर्व सूक्तें मी तुझ्यापुढें मांडतों; आतां तरी ह्या माझ्या हाका तूं ऐकाव्यास !' (७.२९.३). त्याचप्रमाणें दुसरा एक कवि म्हणतो :

**तं पृच्छन्तोऽवरासः पराणि प्रत्ना त इन्द्र श्रुत्यानु येमुः ।**
**अर्चामसि वीर ब्रह्मवाहो यादेव विद्म तात् त्वा महान्तम् ॥**

अर्थ : '(आम्हीं) अर्वाचीन ऋषींनीं, हे इन्द्रा, असा जो तूं त्याच्याबद्दल (जुन्या व जाणत्या ऋषींजवळ) चौकशी करून, तुझीं श्रेष्ठ, पुरातन व कीर्तनीय अशीं कृत्यें माहीत करून घेतलीं आहेत. (तथापि

तुझा महिमा फारच मोठा असल्यामुळें) हे स्तोत्रवाहनवीरा, जितकें आम्हांस माहीत असेल तितकेंच, अत्यंत मोठा असा जो तूं त्याचें स्तवन करूं.' (६.२१.६).

९. जितका सोमरस इन्द्राला प्रिय तितकेंच स्तोत्रहि त्याला प्रिय असतें. स्तोत्र म्हणजे इन्द्राच्या पराक्रमाची, दातृत्वाची, वात्सल्याची व इतर अनेक कल्याणगुणांची मनापासून केलेली स्तुति. जी स्तुति अधिक चांगली, अधिक नवीन व अधिक जोमदार असेल, जी अधिक सुन्दर रूपानें युक्त असेल, जी अधिक हृदयस्पर्शी असेल तीच इन्द्राला आवडेल व तिचाच इन्द्र स्वीकार करील. एका वसिष्ठ कवीनें उत्तम मंत्राचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे :

**मन्त्रमखर्वं सुधितं सुपेशसं दधात यज्ञियेष्वा ।**

अर्थ : 'थोटका नसलेला, सुटसुटीत व बांधेसूद व सुन्दर अलंकारांनीं युक्त असा मंत्र यज्ञार्ह देवांना अर्पण करा.' (७.३२.१३). या अशा मंत्राचें गायन व पठनहि अशा मधुर व मोहक रीतीनें झालें पाहिजे कीं, ज्याचे योगानें इन्द्र आकर्षित होऊन गाय आपल्या वासराकडे धावते त्या ओढीनें कवीकडे धावेल. गाईला दूध देण्यासाठीं जसें पान्हवण तसेंच इन्द्राचें औदार्य वळविण्याचें साधन म्हणजे स्तोत्र असें एका वसिष्ठानें म्हटलें आहे :

**धेनुं न त्वा सूयवसे दुदुक्षन्नुप ब्रह्माणि ससृजे वसिष्ठः ।**

अर्थ : 'सुन्दर कुरणामध्यें चरणाऱ्या दुभत्या गाईप्रमाणें असणारा जो तूं त्या तुझें दोहन करण्याच्या इच्छेनें वसिष्ठानें आपलीं स्तोत्रें तुझ्याकडे (वत्साप्रमाणें) सोडलीं आहेत.' (७.१८.४). अशा मंत्रांचें गायन व पठन चाललें असेल त्या ठिकाणीं इन्द्र आकर्षित होऊन त्या गाणाऱ्यांच्या व पठनकर्त्यांच्या सुरांत सूर मिळवून गाऊं लागतो असें

अनेक ठिकाणीं वर्णन आहे. केऱ्हां कवी स्वतःच इन्द्राला आपल्या मंडळींत येऊन आपल्याबरोबर गाण्याची विनंती करतात :

**एहि स्तोमाँ अभि स्वर अभि गृणीह्या रुव ।**
**ब्रह्म च नो वसो सचा इन्द्र यज्ञं च वर्धय ॥**

अर्थ : 'आमचेकडे ये; आम्हीं रचलेले हे स्तोम आमच्या स्वरांत स्वर मिळवून गा; त्यांची वाहवा कर व ते गुणगुणत राहा. हे इन्द्रदेवा, आमचें स्तोत्र व यज्ञ या उभयतांचा गौरव कर.' (१.१०.४). तसेंच—

**प्र स्तोषदुप गासिषत् श्रवत्साम गीयमानम् ।**
**अभि राधसा जुगुरत् ॥**

अर्थ : 'येथें येऊन इन्द्र आमचेबरोबर स्तोत्रपठन करो, (आम्हीं रचलेल्या सामाचें) गायन करो, आम्ही गात असलेलें साम श्रवण करो, व बक्षीस देऊन आमची वाहवा करो.' (८.८१.५). इन्द्राला अगर अन्य देवतेला अर्पण करावयाचें स्तोत्र धीति म्हणजे विचारपूर्वक रचलेलें असून त्यांत कांहीं तरी नावीन्य असावें व तें अधिक जोमदार असावें, म्हणजे त्या स्तोत्रांतील शब्द व वाक्यें ओजोगुणयुक्त असावीं असा कवींचा उद्देश असे. पाहा :

**प्र तव्यसीं नव्यसीं धीतिमग्नये वाचो मतिं सहसः सूनवे भरे ।**

अर्थ : 'सामर्थ्यपुत्र अग्नीला मी अधिक जोरदार, नावीन्यपूर्ण अशी मानसिक व शाब्दिक प्रार्थना अर्पण करतों.' (१.१४३.१). तसेंच देवाला अर्पण करावयाचें स्तोत्रवचन मधुर असावें अशी कवींची इच्छा. पाहा :

**इदं पित्रे मरुतामुच्यते वचः स्वादोः स्वादीयो रुद्राय वर्धनम् ।**

अर्थ : 'हें गोड पदार्थापेक्षांहि गोड असलेलें स्तोत्र मरुद्गणांचा पिता जो रुद्र त्याच्या गौरवार्थ म्हणून पठन केलें जात आहे.' (१.११४.६). तसेंच—

**अगोरुधाय गविषे द्युक्षाय दस्म्यं वचः ।**
**घृतात्स्वादीयो मधुनश्च वोचत ॥**

अर्थ : ' जिंकण्यासाठीं गाईंच्या शोधार्थ फिरणाऱ्या परंतु स्वतःसाठीं त्यांतली एकहि गाय न ठेवणाऱ्या (म्हणजे जिंकलेलें सर्वच्या सर्वच भक्ताला देऊन टाकणाऱ्या) या द्युलोकांत राहणाऱ्या इन्द्राला प्रभावशाली तथापि ताज्या तुपापेक्षां गोड व मधापेक्षांहि स्वादिष्ट असें स्तोत्र पठन करा. ' (८.२४.२०). इन्द्राला अगर अन्य देवतांना आपल्याकडे ओढून घेण्यासाठीं चाललेल्या चढाओढींत ऋग्वेदकालीन कवींच्या काव्याच्या बाह्यांगाची म्हणजे माधुर्य, ओजस् इत्यादि गुणांची व उपमा, रूपक, श्लेष इत्यादि अलंकारांची, तसेंच काव्याच्या अंतरंगाची म्हणजे निर-निराळे भाव, भावना, मनोविकार वगैरे व्यक्त करणाऱ्या सामर्थ्याची वाढ कसकशी होत गेली हें वरील विवेचनावरून सहज लक्षांत येईल. इन्द्राचे गुण सर्वच लहानथोर नवेजुने कवि वर्णन करतात; परंतु प्रत्येकाची पद्धति वेगवेगळीच असते. अर्थ तोच परंतु वर्णनाचा प्रकार व शैली निराळी. आपलें वर्णन व स्तुति देवतांना इतरांच्यापेक्षां अधिक आकर्षक वाटावी व प्रिय व्हावी या ऋग्वेदकालीन कवींच्या परस्पर स्पर्धेतच आपल्या अलंकारशास्त्राचा उद्गम व विकासाचें मूळ आहे हें उघड आहे. तसेंच आपलें कर्म, आपलें हव्य, आपला यज्ञ देवतांना इतरांच्यापेक्षां अधिक सेव्य व आकर्षक व्हावा या हेतूनें चालविलेल्या परस्पर चढाओढीनेंच आमच्या यज्ञशास्त्राचा विकास झाला हेंहि तितकेंच खरें आहे. तथापि या चढाओढींत विद्वान् व समर्थ कवींचा व यजमानांचाच निभाव लागण्या-सारखा होता. प्रतिभाहीन भक्त व दरिद्री यजमान हे या चढाओढींत मागेंच पडणार. परंतु अशांनींहि या स्पर्धेत भाग घेऊन इन्द्रादि देवतांना आपल्याकडे वश करून घेण्याचा एक निराळाच मार्ग स्वीकारला व या मार्गाचेंच नांव भक्तिमार्ग हें पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल.

१०. प्रत्येक कवि आपल्याला येईल त्या तऱ्हेनें इन्द्राच्या अफाट सामर्थ्याचें व निस्तुल औदार्याचें रसभरित वर्णन करण्याचा प्रयत्न करतोच; परंतु त्याशिवाय हें वर्णन इन्द्राच्या हृदयाची कशी पकड घेईल याचीहि त्याला फार काळजी लागून राहिलेली असते. एक कवि म्हणतो :

**अयं ते स्तोमो अग्रियो हृदिस्पृगस्तु शंतमः ।**

अर्थ : 'तुझ्यासाठीं रचलेला हा माझा स्तोम सर्वांच्या पुढें जाऊन तुझ्या हृदयाला भिडून सुखकर होवो.' (१.१६.७). तर दुसरा म्हणतो :

**वनीवानो मम दूतास इन्द्रं स्तोमाश्चरन्ति सुमतीरियानाः ।**
**हृदिस्पृशो मनसा वच्यमानाः ॥**

अर्थ : 'माझे हे याचना करणारे दूत म्हणजे स्तोम माझ्या मनाबरोबर हळूहळू पुढें सरकून, इन्द्राजवळ जाऊन, त्याच्या हृदयाला भिडून त्याच्या प्रसादांची याचना करीत फिरतात.' (१०.४७.७). तसेंच एक वसिष्ठ कवि म्हणतो :

**श्रुधी हवं विपिपानस्याद्रेः बोधा विप्रस्यार्चतो मनीषाम् ।**
**कृष्वा दुवांस्यन्तमा सचेमा ॥**

अर्थ : 'या आमच्या सोमपान करणाऱ्या अद्रींची हाक ऐक व गाणाऱ्या कवीच्या स्तोत्राचा भावार्थ समजून घे; आणि या (दोनहि प्रकारच्या व इतरहि) सेवा आपल्या (हृदयाच्या) अगदीं जवळ स्थापन कर.' (७.२२.४). मग अर्थातूच ज्या तऱ्हेची सेवा त्या तऱ्हेचें फळ अपेक्षिणारा दुसरा कवि म्हणतो :

**अथा ते अन्तमानां विद्याम सुमतीनाम् ।**
**मा नो अति ख्य आ गहि ॥**

'आणि मग तुझ्या अगदीं जवळच्या म्हणजे हृदयाच्या आंतल्या खणांतील प्रसादांची प्राप्ति आम्हांस होवो. आम्हांला डावलूं नकोस; इकडे ये.' (१.४.३). वैदिक कवी हृदय व मन या दोहोंत हल्लींच्या कल्पनेप्रमाणेंच

फरक करीत होते असें स्पष्ट दिसतें. म्हणूनच पुष्कळ ठिकाणीं ऋचांतून **हृदा मनसा** असा जोड उल्लेख मिळतो. हृदय हें भावनेचें–भक्तीचें– आणि मन हें कल्पनेचें निवासस्थान आहे याची स्पष्ट कल्पना त्यांना होती यांत शंका नाहीं. हल्लींचा 'राजीखुषीनें' हा शब्दप्रयोग 'हृदा मनसा' या वैदिक शब्दप्रयोगाशीं बहुतांशीं समानार्थक आहे. दिलेल्या हव्यानें अगर गायिलेल्या स्तोत्रानें देवतेचें मन व हृदय संतुष्ट व्हावीं ही कवीची इच्छा. पाहा :

**उत हृदोत मनसा जुषाणः उशन्निन्द्र प्रस्थितान्पाहि सोमान् ।**

अर्थ : 'हे इन्द्रा, हृदयानें व मनानें स्वीकार करून तुझ्याकडे येत असलेल्या या सोमरसांचें मोठ्या आवडीनें पान कर.' (७.९८.२). तसेंच—

**स्वादुष्टे अस्तु संसुदे मधुमान् तन्वे तव ।**
**सोमः शमस्तु ते हृदे ॥**

अर्थ : 'हा आमचा सोम तुझ्या रसनेला रुचकर लागो, शरीराला गोड वाटो व हृदयाला आल्हादकारक होवो.' (८.१७.६). आणखी—

**एता ते अग्ने उचथानि वेधो जुष्टानि सन्तु मनसे हृदे च ॥**

अर्थ : 'हे अग्ने, हीं स्तोत्रें तुझ्या अंतःकरणाला व मनाला आवडणारीं अशीं होवोत.' (१.७३.१०). त्याचप्रमाणें पुढील उतारेहि पाहा :

**ते वो हृदे मनसे सन्तु यज्ञा जुष्टासो अद्य घृतनिर्णिजो गुः ।**

अर्थ : 'ते यज्ञभाग तुमच्या हृदयाला व मनाला अत्यंत आवडते होवोत; आज ते शुद्ध तुपांत माखून आपणांकडे गेले आहेत.' (४.३७.२).

**इदं वचः पर्जन्याय स्वराजे हृदो अस्त्वन्तरं तज्जुजोषत् ।**

अर्थ : 'हें स्तोत्र स्वराट अशा पर्जन्याला हृदयाहून अधिक जवळचें वाटो व तो त्याचा स्वीकार करो.' (७.१०१.५).

**इन्द्र स्तोममिमं मम कृष्वा युजश्चिदन्तरम् ।**

अर्थ : 'हे इन्द्रा, या माझ्या स्तोमाला तूं आपल्या सोबत्यापेक्षांहि अधिक जवळचें मान.' (१.१०.९).

**अस्माकमिन्द्र भूतु ते स्तोमो वाहिष्ठो अन्तमः ।**

अर्थ : 'हे इन्द्रा, हा आमचा स्तोम तुला अगदीं जवळचा (नातलग) वाटो, व तुला आमचेकडे वाहून आणण्यांत अतिशय पटाईत ठरो.' (६.४५.३०). स्तोम अगर मंत्र हा देवतेला आपणांकडे वाहून आणण्यासाठीं घोड्यासारखा उपयोगीं पडतो, या स्तोमाच्या योगानें देवतांच्या, विशेषतः इन्द्राच्या, रथाला घोडे जोडले जातात व स्तोम हा मनुष्यांचा देवतेला आणावयास जाणारा दूतच आहे अशी कल्पना वैदिक कवींच्या सूक्तांतून पदोपदीं आढळते. हृदयस्पर्शी स्तुतीबद्दल आणखी एक उतारा पाहा :

**इमां प्रत्नाय सुष्टुतिं नवीयसीं वोचेयमस्मा उशते शृणोतु नः ।**
**भूया अन्तरा हृद्यस्य निस्पृशे जायेव पत्ये उशती सुवासाः ॥**

अर्थ : 'मी ही नवीन स्तुति या पुरातन व ऐकण्यास उत्सुक अशा अग्नीला गाणार आहें; तो आमची (ती स्तुति) ऐको. (नंतर कवि आपल्या स्तुतीला उद्देशून म्हणतो :—) ज्याप्रमाणें संगमोत्सुक सुंदर वस्त्र परिधान केलेली पत्नी आपल्या पतीच्या जवळ जाऊन त्याच्या हृदयाला भिडते त्याप्रमाणें तूं या देवाजवळ जाऊन त्याच्या हृदयाला भीड.' (१०.९१.१३). या उताऱ्यांतील 'उशती जाया' ही उपमा समर्पक आहे. आमची स्तुति ही अन्तर्बाह्य सुंदर आहे, भावपूर्ण आहे असा कवीचा आशय. वैदिक कवी मन व हृदय यांच्यांत महत्त्वाचा फरक करीत होते हें पुढील वचनावरून अधिक स्पष्ट दिसेल. पाहा :

**आ यन्मा वेनाः अरुहन्नृतस्य एकमासीनं हर्यतस्य पृष्ठे ।**
**मनश्चिन्म हृद आ प्रत्यवोचत् अचिक्रदन् शिशुमन्तः सखायः ॥**

अर्थ : 'ज्या वेळीं यज्ञाचे प्रियमित्र (म्हणजे स्तोत्रें) मी एकटाच प्रिय सोमाच्या जवळ बसलों असतां माझ्याशीं लगट करूं लागले (अंगा-

खांद्यावर चढूं लागले), त्या वेळीं माझ्या हृदयाला माझ्या मनानें देखील प्रत्युत्तर दिलें कीं, हे तुझे बच्चेवाले सखे ओरडत आहेत (त्यांच्या साहाय्याला धाव).' (८.१००.५). भक्ताची हाक प्रथम देवाच्या हृदयाला ऐकूं आली म्हणून त्यानें मनाजवळ चौकशी केली, तों त्यानेंहि दुजोरा दिला असा भावार्थ.

११. अशा तऱ्हेची हृदयस्पर्शी स्तुति अर्थात् 'हृदा मनसा' रचलेली असली पाहिजे हें उघड आहे. म्हणून कवि म्हणतो :

**एष वः स्तोमो मरुतो नमस्वान् हृदा तष्टो मनसा धायि देवाः।**

अर्थ : 'हे मरुद्गणांनो, मनानें व अंतःकरणपूर्वक रचलेला हा आदरपूर्ण स्तोम तुम्हांला अर्पण केला आहे.' (१.१७१.२). अंतःकरणपूर्वक रचलेलें स्तोत्र कसें निश्चितफलदायी होतें तें कवि सांगतो :

**विदन्तीमत्र नरो धियंधाः हृदा यत्तष्टान् मन्त्राँ अशंसन् ॥**

अर्थ : 'ज्या अर्थी अंतःकरणपूर्वक रचलेल्या या मंत्रांचें या कवींनीं पठन केलें आहे त्या अर्थी ते या देवाला (म्हणजे) अग्नीला प्राप्त करून घेतीलच.' (१.६७.४). या मंत्रांतील अंतःकरणपूर्वकतेच्या म्हणजेच भक्तिभावाच्या प्रभावाबद्दलचा आत्मविश्वास पाहण्यासारखा आहे. दुसरा एक कवि विचारतो :

**इमं स्वस्मै हृद आ सुतष्टं मन्त्रं वोचेम कुविदस्य वेदत् ।**

अर्थ : 'अंतःकरणापासून व कौशल्यपूर्वक रचलेला हा मंत्र या (अपां नपात्) देवतेला उत्तम रीतीनें गाऊं या. याच्याकडे हा देव लक्ष देईल काय?' (२.३५.२). तरी या सर्वांहून अधिक खुलासेवार असें आपल्या मनःपूर्वक व अंतःकरणापासून रचलेल्या स्तुतीचें वर्णन एका विश्वामित्र कवीनें पुढीलप्रमाणें केलें आहे :

**इन्द्रं मतिर्हृद आ वच्यमाना अच्छा पतिं स्तोमतष्टा जिगाति ।**
**या जागृविर्विदथे शस्यमाना इन्द्र यत्ते जायते विद्धि तस्य ॥**
**दिवश्चिदा पूर्व्या जायमाना वि जागृविर्विदथे शस्यमाना ।**
**भद्रा वस्त्राण्यर्जुना वसाना सेयमस्मे सनजा पित्र्या धीः ॥**

अर्थ : 'माझ्या हृदयापासून बाहेर पडणारी माझी ही स्तोम म्हणून रचलेली मतिरूप औरस कन्या आपला पति जो इंद्र त्याचेकडे जात आहे. ही जागरूक असून हिची चार मंडळींत चांगली वाखाणणी होत असते. हे इंद्रा, हें जें तुझें (विवाहमंगल) होत आहे त्याची जाणीव ठेव. द्युदेवतेच्याहि पूर्वी विद्यमान असलेली अशी ही माझी मतिरूप कन्या जागरूक असून चारचौघांत नांवाजलेली आहे. हिनें शुभ्र व मंगल वस्त्रें धारण केलीं आहेत व ही आमची वाडवडिलांपासून चालत आलेली पुराणी अशी स्तुति आहे.' (३.३९.१,२). या ऋचेंत उत्तम तऱ्हेचे श्लेष व विरोधाभास असे दोन अलंकार साधले आहेत. मतीचीं बहुतेक विशेषणें द्व्यर्थी म्हणजे मतीला व कन्येला अशा दोघांनाहि लागणारीं असून, वडिलोपार्जित कवित्वशक्ति—जिला द्युदेवतेच्याहि अगोदर असलेली म्हणजे पर्यायानें अनादि असें म्हटलें आहे—व वक्त्या ऋषीची स्वतःची तज्जन्य प्रतिभा यांच्या ऐक्यकल्पनेमुळें विरोधाभासहि निर्माण झाला आहे. कवि इन्द्राला सालंकृत कन्यादान करून आपला जांवई ठरवूं पाहात आहे, व जातां जातां आपली स्तुति अंतःकरणपूर्वक केलेली आहे व तिला जितक्या प्रेमानें, कोंवळिकीनें बाप आपल्या प्रिय, कर्तव्यदक्ष, सुंदर, लोकप्रिय व प्रेमळ कन्येला समंजस व गुणज्ञ जांवयाच्या स्वाधीन करतो तितक्याच प्रेमानें, आपुलकीनें आपण तुला अर्पण करीत आहों असेंहि सुचवीत आहे. वैदिक कवी ज्याप्रमाणें हृदामनसा या शब्दसमुच्चयानें किंवा थोडक्यांत म्हणजे अनुराग अथवा भक्ति इत्यादि विकारांचें अधिष्ठान जें हृदय त्याच्या उल्लेखानें आपल्या आपुलकीचा, जिव्हाळ्याचा म्हणजेच

भक्तिभावाचा निर्देश करतात, त्याचप्रमाणें दुसऱ्या आणखी एका तऱ्हेनेंहि ते तसा निर्देश करतात. ही तऱ्हा म्हणजे 'हार्दिक' उपमेचा उपयोग ही होय. ऋग्वेदसूक्तांमध्यें उपमा हा अलंकार प्रामुख्यानें दृष्टीस पडतो व त्या अलंकाराचे अनेक प्रकारहि त्यांतून आढळतात. तथापि प्रयोजनाच्या दृष्टीनें विचार केला तर या सूक्तांतून उपमेचे तीन मुख्य प्रकार दिसून येतात. पहिला प्रकार म्हणजे शोभादायक उपमा. यांत उपमेयाच्या कोणत्याहि अंगाबद्दल अगर स्वरूपाबद्दल साक्षात् नवीन माहिती अगर विवरण नसतें; परंतु ईश्वरदत्त कल्पनेच्या साहाय्यानें श्रोत्याला उपमेयाच्या एकाद्या अंगाबद्दल अगर स्वरूपाबद्दल सहज व आनंदानें माहिती मिळावी अशा बेतानें अशा अंगाबद्दल अगर स्वरूपाबद्दल लोकप्रसिद्ध व श्रोत्याला उत्तम परिचित असलेली उपमेयासारखीच परंतु एकाद्या विशिष्ट गुणांत त्याहूनहि श्रेष्ठ अशी एकादी व्यक्ति श्रोत्याच्या मनश्चक्षूंपुढें आणून उभी करणें हा यांत उद्देश असतो. अशा उपमेंत उपमेयाला कल्पनेपुढें उभ्या केलेल्या व्यक्तीमुळें एक तऱ्हेची शोभा प्राप्त होते म्हणून हिला मीं शोभादायक उपमा असें नांव दिलें आहे. उषादेवीच्या वर्णनांतील पुढील ऋचा पाहा :

**एषा शुभ्रा न तन्वो विदाना ऊर्ध्वेव स्नाती दृशये नो अस्थात् ।**

अर्थ : 'ही उषा आपल्या सुंदर देहाची जाणीव असणाऱ्या गौरवर्ण युवतीप्रमाणें व स्नान करीत उभ्या असणाऱ्या तरुणीप्रमाणें आमच्या दृष्टीसमोर पुढें येऊन ठाकली आहे.' (५.८०.५). या ऋचेंत उषेचें वर्णन करतांना तिच्या पसरत चाललेल्या मनोहर प्रकाशाची यथार्थ कल्पना यावी म्हणून कवीनें आमच्या मनश्चक्षूंसमोर एका आपल्या सौंदर्याबद्दल पूर्ण आत्मविश्वास असलेल्या लावण्यवतीचें उघड्यावर स्नान करीत उभी असतांनाचें नयनरम्य चित्र उभें केलें आहे. हें चित्र ज्या श्रोत्याच्या मनश्चक्षूंपुढें उभें राहील त्याला उषेच्या नितान्तरमणीयतेची कल्पना विनायास येईलच,

परंतु त्याबरोबरच उषेच्या जोडीला उभ्या केलेल्या काल्पनिक मुलीच्या शोभादायक दर्शनानें अत्यंत आनंदहि होईल. अशाच उपमेला मुख्यतः 'अलंकार' हें नांव योग्य आहे. तथापि ऋग्वेदांत आणखीहि दोन तऱ्हेच्या उपमा आढळून येतात. एक म्हणजे केवळ निदर्शक उपमा व दुसरी म्हणजे हार्दिक उपमा. निदर्शक उपमा ही बहुधा काव्यांतून फारशी येत नाहीं. शास्त्रीय ग्रन्थांतून एखाद्या प्रमेयाच्या विवरणासाठीं म्हणून याचा पुष्कळसा उपयोग होतो. नैयायिकांचे घटपटादि दृष्टान्त व वेदान्ताचे रज्जुसर्प, वन्ध्यापुत्र, मृगजल वगैरे दृष्टान्त हे सर्व निदर्शक उपमेंत अंतर्भूत होतील. ऋग्वेदसूक्तांतहि या उपमेचा केव्हां केव्हां उपयोग केला जातो. 'गृणाना जमदग्निवत्', 'मनुष्वत् अग्ने सवनं जुषाणः' वगैरे उपमा केवळ निदर्शकच आहेत. त्यांत उपमानानें उपमेयाला शोभा आणण्याचा कवीचा उद्देश नसतो. केवळ उदाहरण किंवा दृष्टान्त म्हणून त्याची योजना असते. तिसऱ्या म्हणजे हार्दिक उपमेचें प्रयोजन या दोन्ही प्रकारच्या उपमांच्या प्रयोजनांहून अगदीं निराळें असतें. यांत उपमेयाच्या एखाद्या अंगाची अगर स्वरूपाची यथार्थ कल्पना येण्यासाठीं श्रोत्याच्या हृदयाची पकड घेण्याचा वक्त्याचा अगर कवीचा उद्देश असतो. निव्वळ कल्पनेला चालना देण्याचा यांत उद्देश नसतो. म्हणजे या उपमेचा मुख्य रोख मनाकडे नसून हृदयाकडे असतो. जसें—

**इन्द्र क्रतुं न आ भर पिता पुत्रेभ्यो यथा ।**

अर्थ : 'हे इन्द्रा, पिता ज्याप्रमाणें आपल्या पुत्रांना (विनयाधान, रक्षण, भरण इत्यादींनीं) मानसिक सामर्थ्य–बुद्धिपाटव–देतो त्याप्रमाणें तूं आम्हांला दे.' (७.३२.२६). यांत इन्द्राचा व भक्तांचा संबंध कसा आहे अथवा असावा याची यथार्थ कल्पना येण्यासाठीं पितापुत्र या उपमानाची योजना केली आहे. पिता आपल्या पुत्रांना जितक्या प्रेमानें व कळकळीनें अपेक्षित वस्तु देतो तितक्या प्रेमानें व कळकळीनें इन्द्रानें त्या आपल्याला

द्याव्या हा ही उपमा उपयोजिण्यांत कवीचा उद्देश स्पष्ट आहे. थोडक्यांत म्हणजे हृदयनिष्ठ व हृदयगम्य विकार, संबंध इत्यादिकांचें योग्य आकलन होण्यासाठीं, ज्या उपमेंत अशा विकारांचें, अशा संबंधांचें सुप्रसिद्ध अधिष्ठान असलेले आप्त, सखेसोयरे वगैरेंचा उपमान म्हणून उपयोग केला जातो ती हार्दिक उपमा. अशा उपमा ऋग्वेदसूक्तांत पुष्कळच आढळतात व त्यांचें मुख्य प्रयोजन इन्द्रादिक देवतांना आपल्या बाजूला आकर्षित करून घेणें हें आहे.

१२. परस्परांशीं लढणारे दोन्ही पक्ष ज्या वेळीं एकाच देवतेला—विशेषतः इन्द्राला—आपल्या बाजूस ओढून घेण्यासाठीं उत्तमांत उत्तम हव्य, सोम व चांगल्या रीतीनें रचलेलें आणि गायिलेलें स्तोत्र त्याला अर्पण करावयास सरसावतात अशा वेळीं बहुधा कवी या तऱ्हेच्या हार्दिक उपमांचा उपयोग करून इन्द्राला वश करून घेण्याचा यत्न करतात. या उपमांच्या द्वारा ते इन्द्राला असें सुचवितात कीं, माझ्या प्रतिस्पर्ध्यांचीं हव्य, सोम, स्तोत्र वगैरे जरी माझ्या हव्यादिकांसारखींच असलीं तरी माझा तुझ्यावर अधिक जवळच्या संबंधामुळें अधिक हक्क आहे व हा अधिक जवळचा संबंध म्हणजे हृदयांतलि भक्तिभावानें प्रस्थापित केलेलें देव-भक्तांचें नातें, कवी अशा हार्दिक उपमांनीं व्यक्त करतात. अशा हार्दिक उपमांचीं कांहीं उदाहरणें पुढीलप्रमाणें आहेत:

**तिष्ठा सु कं मघवन्मा परा गाः सोमस्य नु त्वा सुषुतस्य यक्षि ।**
**पितुर्न पुत्रः सिचमा रभे ते इन्द्र स्वादिष्ठया गिरा शचीवः ॥ २ ॥**
**परा याहि मघवन्ना च याहि इन्द्र भ्रातरुभयत्रा ते अर्थम् ।**
**यत्रा रथस्य बृहतो निधानं विमोचनं वाजिनो रासभस्य ॥ ५ ॥**
**अपाः सोममस्तमिन्द्र प्र याहि कल्याणीर्जाया सुरणं गृहं ते ।**
**यत्रा रथस्य बृहतो निधानं विमोचनं वाजिनो दक्षिणावत् ॥ ६ ॥**

अर्थ : 'हे इन्द्रा, उभा रहा बरें! परत जाऊं नको. उत्तम रीतीनें पिळलेल्या सोमरसानें तुझें मी स्वागत करतों. माझ्या या अतिशय मधुर स्तोत्राच्या योगानें ज्याप्रमाणें लहान मुलगा आपल्या बापाच्या उपरण्याचा पदर धरून (त्याच्याजवळ हट्ट करतो) त्याप्रमाणें मी तुझ्या वस्त्राचें टोक पकडतों (व हट्ट धरतों कीं तूं माझ्याकडे येच!). हे मघवन्, (घरीं) परत जा व पुनः इकडे ये. हे प्रियबंधो इन्द्रा, (तुझ्या स्वतःच्या घरीं व येथें) दोन्ही ठिकाणीं तुझें अपेक्षित प्रयोजन आहे; जेथें तुझा मोठा रथ सहज ठेवतां येईल व तुझा मोठ्यानें खिंकाळणारा घोडा सोडून सुखानें ठेवतां येईल. आतां तूं सोमपान केलें आहेस, तर आपल्या घरीं परत जा; तुझी पत्नी सुंदर आहे व तुझें घर मनोहर आहे, कीं जेथें तुझा मोठा रथ सहजीं राहील व तुझा घोडा सोडून ठेवतां येऊन कांहीं देणगीहि मिळेल.' (३.५३.२,५,६).

**पितेव नः शृणुहि हूयमानः ।**

अर्थ : 'तुला आम्ही बोलावीत आहोंत तर बाप ज्याप्रमाणें मुलाची हाक ऐकतो त्याप्रमाणें तूं आमची हाक ऐक.' (१.१०४.९).

**मां हवन्ते पितरं न जन्तवः ।**

अर्थ : 'ज्याप्रमाणें (मूल) आपल्या बापाला हाक मारतें त्याप्रमाणें मानवप्राणी मला हाक मारतात.' (१०.४८.१).

**अभ्यावबृत्स्व नो धेनुर्न वत्सं यवसस्य पिप्युषी ।**

अर्थ : 'ज्याप्रमाणें भरपूर चारा खाऊन कासेंत ओसंडतें दूध घेऊन गाय आपल्या वासराकडे परत फिरते तसा तूं मजकडे ये.' (२.१६.८). तूं गाय व मी तुझें वत्स हा भाव. वत्साप्रमाणें अगर लहान बालकाप्रमाणें मी तुझ्यावर विसंबून आहें. तसेंच—

**त्वं हि नः पिता वसो त्वं माता शतक्रतो बभूविथ ।**
**अधा ते सुम्नमीमहे ॥**

अर्थ : 'हे देवा, तूं आमचा पिता आहेस; हे शतक्रतो, तूं आमची आईहि झाला आहेस. म्हणून खरोखर तुझ्या प्रसादाची आम्ही याचना करतों.' (८.९८.११).

**न हि त्वदन्यन्मघवन्न आप्यं वस्यो अस्ति पिता च न ॥**

अर्थ : 'आमचा बाप धरून देखील आम्हांला तुझ्याखेरीज दुसरें कोणीहि अधिक जवळचें नातेवाईक नाहीं.' (७.३२.१९).

**वस्याँ इन्द्रासि मे पितुरुत भ्रातुरभुञ्जतः ।**
**माता च नो छदयथः समा वसो ॥**

अर्थ : 'जेवूं न घालणाऱ्या बापापेक्षां अगर भावापेक्षांहि तूं मला अधिक श्रेष्ठ वाटतोस. आई आणि तूं हीं दोघेंहि (प्रेमळपणांत) मला अगदीं सारखीं वाटतात, हे देवा !' (८.१.६).

**मतयः सोमपामुरुं रिहन्ति...इन्द्रं वत्सं न मातरः ।**

अर्थ : 'हीं आमचीं स्तोत्रें गाई आपल्या वासरांना ज्या प्रेमानें चाटतात त्याच प्रेमानें इन्द्रापाशीं जातात.' (३.४१.५). येथें संबंध थोडा उलट दाखविला आहे. परंतु प्रेमळपणा, वात्सल्य, भक्तिभाव तोच आहे. परंतु या सर्व संबंधांपेक्षांहि अधिक जवळचा व जिव्हाळ्याचा संबंध म्हणजे मित्रामित्रांचा व म्हणून कवि इन्द्राला नेहमींच बजावीत असतो कीं, मी तुझा सखा आहें म्हणून माझ्या हव्यांत अगर स्तोत्रांत कांहीं कमतरता असेल तरी तूं प्रतिस्पर्ध्याला सोडून मजकडे ये. पाहा :

**अभिख्या नो मघवन् नाधमानान् सखे बोधि वसुपते सखीनाम् ॥**

अर्थ : 'हे सख्या मघव्या, तुझी याचना करणारे जे आम्ही त्या आम्हां तुझ्या सख्यांकडे जरा नीट नजर टाक व आमची दखल घे.' (१०.११२.१०).

**धानावदिन्द्रः सवनं जुषाणः सखा सख्युः शृणवद्वन्दनानि ।**

अर्थ : 'लाह्या मिसळलेलें आमचें हें सोमसवन आनन्दानें स्वीकार

करीत करीत हा आमचा सखा इन्द्र आम्हां सख्यांचीं (गायिलेलीं) स्तुति-स्तोत्रें ऐको.' (३.४३.४).

**इन्द्रः पुरस्तादुत मध्यतो नः सखा सखिभ्यो वरिवः कृणोतु ।**

अर्थ : 'हा आमचा सखा इन्द्र, आम्ही जे त्याचे सखे त्यांना पुढें आणि मध्यें (व पाठीमागेंहि) सुखदायक होवो.' (१०.४२.११).

**यो गृणतामिदासिथ आपिरूती शिवः सखा ।**
**स त्वं न इन्द्र मृळय ॥**

अर्थ : 'आपल्या कृपेनें जो स्तोत्रगायकांचा जवळचा नातलग व प्रेमळ सखा बनतो तो तूं, हे इन्द्रा, आमच्यावर दया कर.' (६.४५.१७). तसेंच अग्नीलाहि कवि म्हणतो

**त्वं जामिर्जनानामग्ने मित्रो असि प्रियः ।**
**सखा सखिभ्य ईड्यः ॥**

अर्थ : 'हे अग्ने, तूं लोकांचा जवळचा नातलग व प्रिय मित्र आहेस. तुझ्याशीं सख्य ठेवणारांचा तूं स्तवन करण्यास योग्य असा सखा आहेस.' (१.७५.४). तसेंच

**अग्निं मन्ये पितरमग्निमापिमग्निं भ्रातरं सदमित्सखायम् ।**

अर्थ : 'मी अग्नीला नेहमींच माझा बाप, जवळचा आप्त, भाऊ व सखा असें मानतों.' (१०.७.३). तथापि इन्द्राच्या बाबतींतच सख्य वगैरेचा उल्लेख करण्यास कवि विशेष उत्सुक असतो असें स्पष्ट दिसतें. कांहीं उदाहरणें पाहा :

**वयं त इन्द्र विश्वह प्रियासः सुवीरासो विदथमा वदेम ।**

अर्थ : 'हे इन्द्रा, आम्ही तुला सर्वदा प्रिय होऊन शूर पुत्रादिकांच्या परिवारानें युक्त असे यज्ञसभेंत स्तोत्रपाठक व्हावें.' (२.१२.१५). त्याचप्रमाणें

**अस्य प्रियासः सख्ये स्याम**

अर्थ : 'या (इन्द्राशीं) आमचें सख्य असून आम्हीं त्याला प्रिय व्हावें.' (४.१७.९). तसेंच

**वृणीमहे सख्याय प्रियाय शूरा मंहिष्ठा पितरेव शंभू ।**

अर्थ : 'शूर, अत्यंत दातृत्वशाली व पित्याप्रमाणें कल्याणकारक अशा इन्द्रावरुणा या दोन देवांची त्यांचें आवडतें सख्य मिळविण्यासाटीं आम्ही निवड करतों.' (४.४१.७). पित्यापेक्षां भ्राता, भ्रात्यापेक्षां माता, मातेपेक्षां सखा अशी सर्वसाधारणपणें अनुरागाची चढती श्रेणी वैदिक कवींच्या कल्पनेंत असावी असें दिसतें. तथापि अनुरागाची शेवटची पायरी म्हणजे परस्परांवर अनुरक्त असलेल्या स्त्रीपुरुषांचा अनुराग ही होय. भगवंताचें विश्वरूप पाहिल्यावर अर्जुनाला आपण त्याच्याशीं केलेल्या सलगीबद्दल फार पश्चात्ताप झाला व तोहि म्हणाला :

**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।**
**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥**

अर्थ : 'म्हणून मी पूज्य असा जो तूं त्या ईश्वराला नमस्कार करून, देह तुझ्या चरणावर अर्पण करून, तुझ्या प्रसादाची याचना करतों. पिता ज्याप्रमाणें पुत्राचे, सखा आपल्या सख्याचे व प्रियकर आपल्यावर अनुरक्त असलेल्या प्रियेचे अपराध सहन करतो त्याप्रमाणें तूं माझे अपराध सहन कर.' (भ. गी. ११.४४). अशाच तऱ्हेची उपमा वैदिक कवीहि आपलीं स्तुतिस्तोत्रें व इन्द्र यांच्या संबंधांत वापरून आपली स्तुति अत्यंत अनुरागपूर्ण आहे असें ध्वनित करतात. पाहा :

**पतिं न पत्नीरुशतीरुशन्तं स्पृशन्ति त्वा शवसावन्मनीषाः ॥**

अर्थ : 'अतिशय उत्सुक होऊन म्हणजे प्रेमानें धुंद होऊन ज्याप्रमाणें पत्नी आपल्या प्रेमोत्सुक पतीजवळ जाऊन आलिंगन देतात त्याप्रमाणें माझ्या मनीषा म्हणजे स्तुती तुला आलिंगन देतात.' (१.६२.११). आणखी—

**अच्छा म इन्द्रं मतयः स्वर्विदः सध्रीचीर्विश्वा उशतीरनूषत ।**
**परि ष्वजन्ते जनयो यथा पतिं मर्यं न शुन्ध्युं मघवानमूतये ॥**

अर्थ : 'माझ्या या सर्व स्तुती तेजःपुंज व उत्सुक अशा होऊन एकदम सगळ्याच इन्द्राला हाकारीत आहेत. त्याच्या कृपेसाठीं ज्याप्रमाणें (प्रेमोत्सुक) पत्नी आपल्या पतीला अथवा सुंदर प्रियकराला आलिंगन देतात त्याप्रमाणें त्या त्या मघव्याला म्हणजे इन्द्राला आलिंगन देत आहेत.' (१०.४३.१). या व अशा इतर हार्दिक उपमांतून कवींच्या हृदयांतील इन्द्राबद्दलच्या प्रेमळ सख्यभक्तीचाच आविष्कार स्पष्ट दिसून येतो.

१३. वर परिच्छेद ९ च्या अखेरीस म्हटल्याप्रमाणें भारतीय भक्तिमार्गाचा उद्गम ऋग्वेदकालीन कवींच्या इन्द्रादि देवतांना आपणाकडे आकर्षून घेण्यासाठीं चाललेल्या परस्परस्पर्धेतच आहे व त्याचें प्राथमिक स्वरूप म्हणंजेच स्तुतींच्या पाठीमागें व मुळाशीं असलेला अंतःकरणाचा भक्तिभाव हें वरील विवेचनावरून स्पष्ट होण्यासारखें आहे. भक्तिभावाची विशेष महती दीनदुबळ्या व दरिद्री भक्तांनाच असते. द्रव्याच्या जोरावर उपलब्ध होणारे उपचार आपल्या देवतेला आपणांस अर्पण करतां येत नाहींत, परंतु त्यांची जागा आपण आपल्या भक्तिभावानें भरून काढूं शकतों अशी स्पष्ट जाणीव वैदिक कवींनाहि झालेली होती व म्हणूनच त्यांनीं देवतेच्या हृदयांतील व आपल्या हृदयांतील प्रेम, सख्य इत्यादि विकारांचा उल्लेख आपल्या सूक्तांतून वारंवार केलेला आहे. आपल्या देवाची योग्यता व सामर्थ्य फार मोठीं आहेत व त्या मानानें आपली देणगी अत्यंत अल्प आहे याबद्दलची टोचणी वैदिक ऋषींच्या मनाला असते, म्हणूनच ते देवाच्या सुमति, सुम्न, सख्य, प्रेम वगैरेची याचना करीत असतात. त्याचप्रमाणें वेदोत्तरकालीन एकनिष्ठ भक्तांच्या ईश्वराबद्दलच्या जशा कांहीं विशिष्ट

कल्पना आहेत, म्हणजे तो दीनवत्सल आहे, तो अत्यंत मायाळू व उदार आहे, तसेंच ज्याप्रमाणें आपल्याला आपल्या अत्यंत प्रेमळ नातेवाइकाजवळ अतिशय मोकळेपणानें बोलतां येतें तसें देवाजवळ भक्ताला निर्भयपणानें आपलें अंतःकरण उघडें करतां येतें, देव भक्तासाठीं वाटेल तें करतो, अशाच तऱ्हेच्या कल्पनाहि वैदिक कवींच्या सूक्तांतून स्पष्ट दिसून येतात. वेदोत्तर कालांत, विशेषतः पुढील संत वाङ्मयांत, ज्याप्रमाणें मुख्य देव विष्णु त्याप्रमाणें ऋग्वेदांत मुख्य देव इंद्र. त्यामुळें संत वाङ्मयांत विष्णूवर आरोप केलेले सर्व गुण व वैशिष्ट्यें ऋग्वेदांतील इंद्राबद्दलहि उल्लेखिलेलीं आढळतात. इंद्राच्या दीनवत्सलत्वाचा उल्लेख पुढील ऋचांतून आढळतो :

**किमङ्ग रध्रचोदनः सुन्वानस्यावितेदसि ।**
**कुवित् स्विन्द्र णः शकः ।**

अर्थ : 'मग दीनदुबळ्यांच्या मदतीस धावणारा असा जो तूं तो तुला सोम अर्पण करणाऱ्या ऋषीचा त्राताच कशासाठीं झालास? मग तूं आम्हांला मदत करणार ना?' (८.८०.३). तसेंच—

**इन्द्र तुभ्यमिन्मघवन्नभूम वयं दात्रे हरिवो मा वि वेनः ।**
**नकिरापिर्ददृशे मर्त्यत्रा किमङ्ग रध्रचोदनं त्वाहुः ॥**

अर्थ : 'हे इंद्रा, आम्ही तुझ्यासारख्या दात्याशींच एकनिष्ठपणानें राहात आहोंत. आतां डळमळूं नकोस. मनुष्यांमध्यें आम्हांला तुझ्यासारखा कोणीच प्रेमळ आप्त आढळला नाहीं. (आम्हांस मदत करणार नसशील तर) मग लोक तुला दीनोद्धारक तरी कां व कशाला म्हणतात?' (६.४४.१०). दुसरा एक दुबळा कवि आपल्या योगक्षेमाचा सर्वच भार वकिली थाटांत देवावर घालतो :

**अमाजूरिव पित्रोः सचा सती समानादा सदसस्त्वामिये भगम् ।**
**कृधि प्रकेतमुप मास्या भर दद्धि भागं तन्वो येन मामहः ॥**

अर्थ : 'ज्याप्रमाणें घरांतच म्हातारी होणारी (म्हणजे शारीरिक

व्यंगामुळें लग्न न होतां घरांत वाढलेली) कन्या आपल्या आईबापांजवळ राहून एकाच जाग्यावर बसून (आपल्या योगक्षेमाची अपेक्षा करते) त्याचप्रमाणें (एकाच जाग्यावर बसून) मी आपल्या भाग्याबद्दल तुझ्याजवळ याचना करतों. माझ्याकडे लक्ष दे; (मला द्यावयाचें तें येथेंच) आण व मोजून दे. माझा स्वतःचा वांटा मला मिळवून दे कीं जेणेंकरून तुला मोठेपणा प्राप्त होईल.' (२.१७.७). देवाला लोकांनीं मोठा म्हणावयास पाहिजे असल्यास त्यानें माझ्यासारख्या दुबळ्याच्या योगक्षेमाची सोय करावी. नाहीं तर मी लोकांत सांगत फिरणार कीं, कसला हा इन्द्र मोठा ! माझ्यासारख्या क्षुद्र सेवकाची सोय देखील त्याला करतां येत नाहीं ! असा कवीचा भावार्थ. आणखी कांहीं उतारे पाहा :

**यस्पतिर्वार्याणामसि रध्रस्य चोदिता ।**
**इन्द्र स्तोतॄणामविता ॥**

अर्थ : 'जो तूं लोभनीय वस्तूंचा मालक व दीनांचा प्रेरक तसाच, हे इन्द्रा, आपल्या स्तोत्यांचा पाठीराखा आहेस.' (१०.२४.३). तसेंच—

**अविप्रे चिद्वयो दधदनाशुना चिदर्वता ।**
**इन्द्रो जेता हितं धनम् ॥**

अर्थ : अजाणत्या भक्ताला देखील इन्द्र सामर्थ्य देतो; मंद अशा घोड्या-कडून देखील पणाला लावलेलें धन तो जिंकून दाखवितो.' (६.४५.२).

**यो रध्रस्य चोदिता यः कृशस्य यो ब्रह्मणो नाधमानस्य कीरेः ।**

अर्थ : 'जो दीनाचा व दुबळ्याचा प्रेरक आहे व जो याचना करणाऱ्या ब्राह्मणाचा अगर रंकाचाहि साहाय्यकर्ता आहे.' (२.१२.६).

**कीरिश्चिद्धि त्वामवसे जुहाव ईशानमिन्द्र सौभगस्य भूरेः ।**

अर्थ : 'एकादा रंक देखील, हे इन्द्रा, विपुल ऐश्वर्याचा मालक जो तूं त्याला स्वसंरक्षणार्थ हाक मारतो.' (७.२१.८). वसिष्ठाच्या हाकेला हाक

देऊन ज्या वेळीं इन्द्रानें मूठभर भरतांच्या बाजूनें लढून विरुद्ध बाजूच्या प्रबल अशा दहाहून अधिक राजांचा पराभव करून त्यांच्या सैन्याचा धुव्वा उडवून दिला त्या वेळीं वसिष्ठ अभिमानानें म्हणतो :

**आध्रेण चित् तद्वेकं चकार सिंह्यं चित्पेत्वेना जघान ।**
**अव स्रक्तीर्वेश्यावृश्चदिन्द्रः प्रायच्छद्विश्वा भोजना सुदासे ॥**

अर्थ : 'इन्द्रानें तें दरिद्र्याच्या हातून एक मोठें काम घडवून आणलें. बोकडाकडून सिंहाला ठार मारवलें. लहानशा सुईनें मोठमोठाल्या तुळयांना भोकें पाडलीं, व सर्व प्रकारच्या भोग्य वस्तू (बलाढ्य शत्रूकडून लुबाडून घेऊन) सुदासाला प्राप्त करून दिल्या ! ' (७.१८.१७). महाराष्ट्रीय संतमंडळींच्या विठोबाप्रमाणेंच वैदिक भक्तांचा इन्द्र त्यांच्यासाठीं प्रसंग पडल्यास वाटेल तें रूप घेण्यास तयार असतो. आपल्याजवळ असलेलें अथवा शत्रूजवळून जिंकून आणलेलें सर्व वैभव भक्ताला देऊन टाकण्याची इन्द्राची नेहमींचीच संवय ! पाहा :

**स नः स्तवान आ भर रयिं चित्रश्रवस्तमम् ।**
**निरेके चिद्यो हरिवो वसुर्ददिः ॥ ३ ॥**
**आ निरेकमुत प्रियमिन्द्र दर्षि जनानाम् ।**
**धृषता धृष्णो स्तवमान आ भर ॥ ४ ॥**

अर्थ : 'हे हरींच्या मालका (इन्द्रा), जो तूं देव आपलें सर्व वैभव संपेपर्यंत देणारा दाता आहेस [निरेके – नि + रिच्; ददि – दा], त्या तुझी अशा तऱ्हेनें स्तुति केल्यावर आम्हांस सुंदर व सुप्रसिद्ध असें ऐश्वर्य दे. आपल्याजवळचें अगदीं शेवटचें राहिलेलें द्रव्य (निरेक) अगर आपणास प्रिय असलेली वस्तूसुद्धां तूं (भक्त) लोकांना सहज काढून देतोस ! हे धाडसी देवा आम्हीं तुझी स्तुति केली म्हणून तूं आम्हांला धाडसानें इष्ट वस्तु आणून दे.' (८.२४.३,४). हा देव भक्तांना दोन दोन हातांनीं संपत्ति देत असतो.

**सं गृभाय पुरू शता उभयाहस्त्या वसु ।**
**शिशीहि राय आ भर ॥**
**यदिन्द्र चित्र मेहना अस्ति त्वादातमद्रिवः ।**
**राधस्तन्नो विदद्वसो उभयाहस्त्या भर ॥**

अर्थ : 'अनेक शेकड्यांनीं मोजतां येईल असें धन गोळा करून आम्हाला दोन्ही हातांनीं आणून दे; आम्हांला (संपत्ति घेण्यास) योग्य बनव व संपत्ति दे. हे सुंदर इन्द्रा, जें कांहीं तुझें औदार्य, जी तूं देण्याजोगी देणगी, व जें बक्षीस तुझ्याजवळ असेल तें सर्व, हे सुसंपन्न वज्रधरा, दोन दोन हातांनीं तूं आम्हांला अर्पण कर.' (१.८१.७;५.३९.१). अशा रीतीनें धन देत असतां त्याला कोणीहि अडवूं शकत नाहीं.

**न ते सव्यं न दक्षिणं हस्तं वरन्त आमुरः ।**
**न परिबाधो हरिवो गविष्टिषु ॥**

अर्थ : 'हे हरींच्या मालका, (दोनहि हातांनीं दान देत असतां) तुझा डावा अगर उजवा हात घातक शत्रू अडवूं शकत नाहींत; तसेंच बलाढ्य शत्रू युद्धांत तुझें निवारण करूं शकत नाहींत.' (८.२४.५). शत्रूकडून लढाईंत लूट जिंकावयाची व सर्वच्या सर्व—आपणांस कांहींहि न ठेवतां—भक्तांना देऊन टाकावयाची हें इन्द्राचें नेहमींचें व्रत ! पाहा :

**त्वं जिगेथ न धना रुरोधिथ अर्भेष्वाजा मघवन्महत्सु च ॥**

अर्थ : 'लहान अगर मोठमोठ्या लढायांतून तूं नाना तऱ्हेची संपत्ति जिंकून आणतोस व त्यांतली आपणांसाठीं कांहींहि राखून ठेवीत नाहींस.' (१.१०२.१०). दुसरा कवि म्हणतो :

**वेदाहमस्य निभृतं म एतद् दित्सन्तं भूयो यजतश्चिकेत ।**

अर्थ : 'याचें (हें रहस्य) मला माहीत आहे; याबद्दल माझी खात्रीच आहे. (शिवाय), पवित्र (अग्नि अथवा सोम) यालाहि इन्द्र हा अतिशय

दान देऊं इच्छिणारा आहे हें ठाऊक आहे.' (२.१४.१०). तसेंच दुसरा कवि सांगतो :

**वसु स्पार्हमुत जेता उत दाता ॥**

अर्थ : '(हा इन्द्र) स्पृहणीय संपत्ति इकडे (एका हातानें) जिंकून आणतो व इकडे (दुसऱ्या हातानें भक्ताला) देऊन टाकतो!' (१०.५५.६). परंतु केव्हां केव्हां अशा रीतीनें सर्वच्या सर्व जिंकलेलें अगर जवळ असलेलें धन देऊन टाकल्यावर नंतर आलेल्या याचक भक्ताला देण्यासारखें कांहींच उरलेलें नसल्यामुळें इन्द्राला मोठीच अडचण भासते. अशा वेळीं तो भक्ताला पाहिजे असलेल्या वस्तूचेंच रूप घेऊन त्याच्या स्वाधीन होतो इतका विचित्र औदार्याचा दाता इन्द्र असल्याबद्दल ऋग्वेदीय कवी ग्वाही देतात. खालील वचनें पाहा :

**अददा अर्भां महते वचस्यवे कक्षीवते वृचयामिंद्र सुन्वते ।**
**मेनाभवो वृषणश्वस्य सुक्रतो विश्वेत् ता ते सवनेषु प्रवाच्या ॥**

अर्थ : 'हे बुद्धिमान् इन्द्रा, तूं तुझ्यासाठीं सोम गाळणाऱ्या मोठ्या व वक्तृत्वपूर्ण कक्षीवान् नांवाच्या तुझ्या भक्ताला वृचया नांवाची तरुण लहानगी बायको मिळवून दिलीस! तसेंच वृषणाश्व नांवाच्या भक्तासाठीं तूं स्वतःच त्याची बायको झालास! (तीनहि) सवनांच्या वेळीं हीं तुझीं सर्व (कृत्यें) प्रकटपणें गायन करण्याजोगीं आहेत.' (१.५१.१३). तसेंच—

**दूणाशं सख्यं तव गौरसि वीर गव्यते ।**
**अश्वो अश्वायते भव ॥**

अर्थ : 'तुझें सख्य दुर्लंघ्य आहे. ज्या भक्ताला गाय हवी असेल त्याच्यासाठीं तूं गाय बनतोस. घोडा हवा असेल त्याच्यासाठीं तूं घोडाहि बन.' (६.४५.२६).

**इत्था धीवन्तमद्रिवः काण्वं मेध्यातिथ्यम् ।**
**मेषो भूतोभि यन्नयः ॥**

अर्थ : 'याचप्रमाणें तुझा स्तोता काण्व मेध्यातिथ्य याच्याकडे तूं मेंढा होऊन गेलास (व त्याचें कार्य साधलेंस).' (८.२.४०). इन्द्राप्रमाणेंच दीन-दुबळ्या, रुग्ण, अडचणींत सांपडलेल्या जीवांच्या मदतीला धावून जाणें हें अश्विनौ देवांचेंहि नित्याचें व्रत आहे. एखाद्या घोड्याचा पाय मोडला, चिमणीच्या जिवावर बेतलें, कोणी दरिद्री उपाशी मरत असला, कोणी बुडत असला, कोणाचे डोळे फुटले असले, कोणा बाईची सुटका होत नसली अगर तिला मूलच होत नसलें तर त्या जीवानें धावा करावयाची खोटी कीं हे देव लगेच त्याच्या मदतीला धावून जावयाचे. इन्द्राचीहि केव्हां केव्हां अशी मदत झाल्याचा उल्लेख पुढील ऋचेंत सांपडतो :

**य ऋते चिदभिश्रिषः पुरा जत्रुभ्य आतृदः ।**
**संधाता सन्धिं मघवा पुरूवसुरिष्कर्ता विह्रुतं पुनः ॥**

अर्थ : 'ज्या मघव्यानें (शत्रूच्या बाणानें प्रहार होऊन भक्ताच्या मानेचा सांधा तुटला असतां) जखम जत्रूपर्यंत जाऊन पोंचण्याच्या आधींच कांहींहि साधनावांचून (बंदावांचून) तो सांधा पुन्हा सांधला, त्याच विपुल संपत्तीच्या मालकानें भक्ताचें जें जें अंग तुटलें होतें तें तें पुनः व्यवस्थित नीट केलें.' (८.१.१२). अशा अनाथांना केलेल्या साहाय्याचें रसभरित व भावपूर्ण वर्णन अश्विनांच्या व इन्द्राच्या बाबतींत वैदिक कवी विशेषेंकरून करतात. या अशा वर्णनावरूनहि देवाबद्दल कवीच्या मनांत असलेला अनुराग अथवा भक्तिभाव स्पष्ट दिसून येतो. रामायणांतील रामाप्रमाणेंच वैदिक इन्द्राचेंहि एक वैशिष्ट्यपूर्ण वर्णन आहे. **अपाला** नांवाच्या एका मुलीला कांहीं त्वचेच्या रोगानें विवाह न होतां आपल्या दरिद्री बापाच्या घरींच दिवस कंठावे लागत होते. अत्यंत गरिबीमुळें—पडशेतीची थोडीशी जमीन हेंच त्या बिचाऱ्याचें वैभव होतें—त्या तिच्या बापाला यज्ञयागादि कर्में करून, देवांना प्रसन्न करून घेऊन, दुःखनिवारण करणें शक्य नव्हतें. एक दिवस **अपाला** पाणवठ्यावर जात असतां

तिला वाटेंत पडलेला सोमवल्लीचा एक तुकडा सांपडला. तिनें तो घरीं आणला व तो आपल्या दांतांनीं चावून त्याचा रस काढून, घरांत असलेला मालमसाला त्यांत घालून इन्द्राला देण्यासाठीं म्हणून बाजूस ठेवून दिला. इन्द्राला हें कळल्यावर तो एका तरुणाचें रूप घेऊन तिच्या घरीं गेला व मोठ्या प्रेमानें त्या सोमरसाचा—दांतांनीं चावून पिळलेल्या सोमरसाचा—स्वीकार करून त्यानें तिला रोगमुक्त केलें व तिच्या बापाला संपन्न केलें. या ठिकाणीं शबरीनें रामाला दिलेल्या बोरांची आठवण झाल्यावांचून राहात नाहीं. शबरीच्या देणगीप्रमाणेंच **अपाले**ची देणगी अवैध अथवा अयोग्य मार्गानें अर्पण केलेली अशी होती. आणि ज्या कारणासाठीं, म्हणजे देणगी-पाठीमागील जिव्हाळा, आपलेपणा, अत्यंत अनुराग किंवा भक्तिभाव यांच्यामुळें—रामानें तिचा प्रेमानें स्वीकार केला त्याच कारणासाठीं, म्हणजे **अपाले**च्या हृदयांतील भोळ्या भक्तिभावामुळेंच इन्द्रानें तिच्या या देणगीचा स्वीकार केला असला पाहिजे असें मानणें सयुक्तिक आहे. इन्द्राचा कामुक-पणा हें ऋग्वेदोत्तर कालांतील वैदिक वाङ्मय व वेदोत्तरकालीन वाङ्मय या दोहोंतहि इन्द्राचें एक वैशिष्ट्य म्हणून दृष्टीस पडतें; परंतु ऋग्वेदसूक्तांत तें तसें असल्याचें कोठेंच ठळकपणानें दृष्टीस पडत नाहीं. म्हणून शाट्यायन ब्राह्मणाच्या आधारावर दिलेल्या सायणभाष्यांतील इतिहासावर अवलंबून इन्द्रानें **कामुक**त्वानें **अपाले**च्या रसाचें ग्रहण तिच्या **मुखांतून**च केलें असें मानणें अयोग्य होईल. दुर्दैवानें संहिताकालांत वाढीस लागलेल्या भक्तिमार्गाचा ब्राह्मणकालांतील कर्ममार्गाच्या प्राबल्यामुळें जवळजवळ लोप झाल्यामुळें अशा या भक्तिलोलुपतेवर कामुकतेचा आरोप होऊन मूळ कथेचा विपर्यास झाला. अशाच तऱ्हेचा विपर्यास इन्द्राच्या इतर गुणां-चाहि झालेला आपणांस ऋग्वेदोत्तर कालांत विपुलपणें पाहावयास मिळतो. हा भारतीय आर्यांच्या बदलत्या दृष्टिकोनाचा परिणाम आहे हें विचारा-अंतीं ध्यानांत येण्यासारखें आहे. वास्तविक, शबरीच्या उच्छिष्ट बोरांनीं

रामाचें झालेलें समाधान, द्रौपदीच्या थाळीला चिकटलेल्या एका भाजीच्या पानानें भागलेली श्रीकृष्णाची भूक, किंवा हरिदासी कथेंतील म्हातारीच्या तीर्थोटीमर दुधानें संपूर्ण भरून गेलेलें शंकराचे देवळांतील गर्भगृह हीं सर्व ज्याप्रमाणें आम्हां भारतीय आर्यांच्या निःसीम भक्तिभावाविषयींच्या कल्पनेचीं उच्च प्रतीकें आहेत त्याचप्रमाणें अपालेनें भक्तीच्या भरांत आपल्या दाढांनीं पिळून दिलेल्या सोमरसानें झालेला इन्द्राचा संतोष हाहि याच कल्पनेचें एक वेदकालीन उच्च प्रतीक मानणें हेंच योग्य आहे. ऋग्वेद-संहितेंतील इन्द्रसूक्तांचा निर्विकार मनानें मौलिक अभ्यास करणाराला वेदोत्तरकालीन श्रीकृष्ण व ऋग्वेदकालीन इन्द्र यांच्यांत बरेंचसें तात्त्विक साम्य आढळून येईल असें मला वाटतें. असो; हें सुंदर अपालासूक्त संपूर्ण उद्धृत करण्याचा मोह मला आवरत नसल्यामुळें मी तें येथें देतों :

**कन्या वारवायती सोममपि स्रुताविदत् ।**
**अस्तं भरन्त्यब्रवीत् इन्द्राय सुनवै त्वा शक्राय सुनवै त्वा ॥ १ ॥**
**असौ य एषि वीरको गृहंगृहं विचाकशत् ।**
**इमं जम्भसुतं पिब धानावन्तं करम्भिणमपूपवन्तमुक्थिनम् ॥ २॥**
**आ चन त्वा चिकित्सामः अधि चन त्वा नेमसि ।**
**शनैरिव शनकैरिव इन्द्रायेन्दो परि स्रव ॥ ३ ॥**
**कुविच्छकत् कुवित्करत् कुविन्नो वस्यसस्करत् ।**
**कुवित्पतिद्विषो यतीरिन्द्रेण संगमामहै ॥ ४ ॥**
**इमानि त्रीणि विष्टपा तानीन्द्र वि रोहय ।**
**शिरस्ततस्योर्वरां आदिदं म उपोदरे ॥ ५ ॥**
**असौ च या न उर्वरा आदिमां तन्वं मम ।**
**अथो ततस्य यच्छिरः सर्वा ता रोमशा कृधि ॥ ६ ॥**
**खे रथस्य खेऽनसः खे युगस्य शतक्रतो ।**
**अपालामिन्द्र त्रिष्पूत्वी अकृणोः सूर्यत्वचम् ॥ ७ ॥**

अर्थ : ‘एकदां एका कन्येला पाणवठ्यावर जात असतां वाटेंत एक सोम (वल्लीचा तुकडा) सांपडला. तो घरीं आणीत असतां ती त्या सोमाला म्हणाली : “मी तुला इन्द्रासाठीं पिळीन; मी तुझा इन्द्रासाठीं रस काढीन.” (असा विचार करून, घरीं जाऊन रस वगैरे तयार करून ती इन्द्राला उद्देशून म्हणाली :) ‘हे इन्द्रा, जो तूं झगझगीत पोषाख करून तरुण वीराच्या रूपानें (भक्तांच्या) घरोघरीं (सोमपानाच्या इच्छेनें) हिंडत असतोस तो तूं (माझ्या घरीं येऊन) माझ्या या दाढांनीं पिळलेला सोमरस पी; मी त्याच्याबरोबर तुला भाजलेल्या लाह्या, पेज, अपूप व एक उक्थ म्हणजे स्तोत्रहि अर्पण करीत आहें. [ जम्भसुतं म्हणजे दाढांनीं पिळलेला असा सर्वसाधारणपणें अर्थ केला जातो. कदाचित् जम्भ म्हणजे रस काढण्याचें दाढांसारखें दिसणारें घरगुती दगडी अगर लाकडी यंत्रहि असूं शकेल. ] (ही त्या कन्येची म्हणजे अपालेची विनंति ऐकल्यावर इन्द्र तरुण वीराच्या रूपानें तेथें आला. परंतु त्याला पाहून तो इन्द्रच असावा अशी तिची खात्री न पटल्यामुळें ती त्या तरुणास म्हणते :) आम्ही तुला पाहून ओळखण्याचा प्रयत्न करीत आहोंत, परंतु अद्यापि आम्ही तुला (इन्द्र म्हणून) ओळखला नाहीं. (नंतर ती पिळीत असलेल्या सोमाकडे पाहून त्याला म्हणते :) हे सोमा, तूं आपला इन्द्रासाठीं हळूहळू रसरूपानें (वल्लींतून) बाहेर ये. [ हा तरुण इन्द्र असो अगर नसो; तूं आपला त्याच्यासाठीं तयार राहा. इन्द्र आतां नाहीं तर मग तरी येणारच, असा तिच्या म्हणण्याचा भावार्थ. ] (मग ती आपल्याशींच विचार करते :) हा तरुण (माझी इच्छा पूर्ण करूं) शकेल का ? करील का ? म्हणजे आम्हांला रोगमुक्त व अव्यंग करील का ? [ वस्यान् म्हणजे अधिक चांगली, पर्यायानें रोगमुक्त असा अर्थ. ] (शारीरिक व्यंगामुळें) पतीचा द्वेष करीत जाणारी, म्हणजे लग्नाबद्दल तिरस्कार वाटणारी; जी मी तिची खरोखरच (खऱ्याखऱ्या) इन्द्राशीं गांठ (आज) पडणार

आहे काय? (नंतर तिची खात्री पटून ती इन्द्राला सोम अर्पण करते. तो घेऊन इन्द्र प्रसन्न होऊन तिची इच्छा काय तें विचारतो—वर माग असें म्हणतो; त्यावर ती सांगते :) 'हे इन्द्रा, हे तीन प्रदेश पाहा; त्यांच्यावर योग्य तऱ्हेची वाढ होईल असें कर—तीं तीन स्थानें म्हणजे माझ्या या बापाचें (टक्कल असलेलें) मस्तक; ही आमची (नापीक) शेतजमीन आणि हें तिसरें म्हणजे माझ्या पोटाच्या खालचा भाग. ही जी आमची शेतजमीन आहे, तसेंच हें माझें शरीर, आणि नंतर माझ्या बाबांचें जें हें मस्तक आहे, त्या सर्वांवर योग्य प्रकारची (केसांची व शेताची) वाढ होईल असें कर.' (नंतर कवि म्हणतो :) रथाच्या भोकांतून एकदां, गाड्याच्या भोकांतून एकदां व जोखडाच्या भोकांतून एकदां असें तीन वेळां अपालेचें शरीर पिळून काढून, हे इन्द्रा, तूं अपालेला सूर्याप्रमाणें तेजस्वी अशी कातडी मिळवून दिलीस.' (८.९१.१-७).

१४. भक्तिमार्गाचे श्रेष्ठ प्रवर्तक नामदेव, तुकाराम वगैरे संत मंडळींच्याप्रमाणेंच इन्द्राचे भक्तहि इन्द्राशीं लडिवाळपणानें भांडतात व मनमोकळेपणानें बोलतात. याचींहि कांहीं उदाहरणें पाहा :

**भद्रा ते हस्ता सुकृतोत पाणी प्रयन्तारा स्तुवते राध इन्द्र ।**
**का ते निषत्तिः किमु नो ममत्सि किं नोदुदु हर्षसे दातवा उ ॥**

अर्थ : 'तुझे बाहू सुंदर व हातहि चांगले आणि भक्ताला इच्छित देणगी देणारे असे आहेत. मग, हे इन्द्रा, तूं असा बसून कां? तुझ्या तोंडावर आनंद कां दिसत नाहीं? आम्हांस (इच्छित देणगी) द्यावयास तुला हर्षाच्या उकळ्या कां फुटत नाहींत?' (४.२१.९). तसेंच

**यदिन्द्र पूर्वो अपराय शिक्षन्नयज्ज्यायान्कनीयसो देष्णम् ।**
**अमृत इत्पर्यासीत दूरं आ चित्र चित्र्यं भरा रयिं नः ॥**

अर्थ : 'ज्या वेळीं जुना अनुभवी पुरुष नवीन अननुभवी माणसाला

मदत करण्याची इच्छा करतो त्या वेळीं तो वडीलधारा मनुष्य आपल्या लहानग्या मित्राची देणगी स्वीकारतोच. (ही तर माणसांची गोष्ट;) आणि तूं अमर्त्य असा देवच आहेस, मग असें असूनहि तुझ्यासारख्यानें रुसून दूर बसून राहावें? हे सुंदर देवा, आम्हांला सुंदर अशी संपत्ति मिळवून आण.' (७.२०.७). त्याचप्रमाणें :

**उतो घा ते पुरुष्या इदासन् येषां पूर्वेषामशृणोर्ऋषीणाम् ।**
**अधाहं त्वा मघवञ्जोहवीमि त्वं न इन्द्रासि प्रमतिः पितेव ॥**

अर्थ : 'आणि हे देवा, ज्या प्राचीन ऋषींचें गाऱ्हाणें तूं ऐकलेंस ते तरी पुरुषच होते (आमच्यासारखे)! (मग मीहि पुरुषच आहें;) म्हणूनच मी आतां तुला टाहो फोडून हाका मारीत आहें. आमच्या योगक्षेमाची तरतूद करणाऱ्या पित्याप्रमाणेंच तूं आम्हांला आहेस.' (७.२९.४). आणखी पाहा :

**मा त्वा सोमस्य गल्दया सदा याचन्नहं गिरा ।**
**भूर्णिं मृगं न सवनेषु चुक्रुधं क ईशानं न याचिषत् ॥**

अर्थ : 'हे इन्द्रा, मी सदा नि कदा सोमानें (म्हणजे सोमपानानें) गद्गदित झालेल्या माझ्या स्तोत्रांतील भाषेनें तुझ्याजवळ भीक मागतों म्हणून चवताळलेल्या श्वापदाप्रमाणें सवनांचे वेळीं तूं माझ्यावर कोपूं नकोस! समर्थापाशीं भिक्षा मागणार नाहीं असा कोण आहे?' (८.१.२०). इन्द्रासारख्या समर्थ देवाचा भक्तहि समर्थच असला पाहिजे. मी तर दरिद्री. म्हणून मी तुझी दातृत्वाबद्दल कितीहि महती गायिली तरी ती माझे यजमान थोडेच मानणार! म्हणून मला श्रीमंत कर अशी वकिली थाटाची रदबदली एक कवि करतो :

**रेवाँ इद्रेवतः स्तोता स्यात्त्वावतो मघोनः ।**
**प्रेदु हरिवः श्रुतस्य ॥ १३ ॥**
**उक्थं चन शस्यमानं अगोररिरा चिकेत ।**
**न गायत्रं गीयमानम् ॥ १४ ॥**

अर्थ : 'हे इन्द्रा, तुझ्यासारख्या संपन्न दात्याचा स्तोता संपन्नच असला पाहिजे व तुझ्यासारख्या प्रख्यात दात्याचा स्तोता प्रख्यातच असावयास हवा. कारण, कोणताहि श्रीमान् (मनुष्य) दाता एकहि गाय जवळ नसलेल्या म्हणजे दरिद्री स्तोत्यानें पठन केलेल्या उक्थाकडे अगर त्यानें गायिलेल्या गायत्र सामाकडे बिलकूल लक्ष देत नाहीं.' (८.२.१३,१४). दुसऱ्या कोणाच्या सांगण्यावरून इन्द्र आपल्याकडे न येतां दुसऱ्याकडेच ठाण मांडून बसला आहे अशी कल्पना करून एक कवि इन्द्राला म्हणतो :

**स्ववृजं हि त्वामिन्द्र शुश्रव अनानुदं वृषभ रध्रचोदनम् ।**
**प्र मुञ्चस्व परि कुत्सादिहा गहि किमु त्वावान्मुष्कयोर्बद्ध आसते ॥**

अर्थ : 'हे पराक्रमी इन्द्रा, मीं असें ऐकिलें आहे कीं, तूं स्वतःच्याच मर्जीनें चालणारा, कधींहि माघार न घेणारा व दीनांचा प्रेरक असा आहेस. मग तर तूं (आपली जागा) सोड आणि त्या कुत्साकडून इकडे ये. तुझ्यासारखा वीर बैठकीला जखडून धरल्यासारखा कां बसत आहे?' (१०.३८.५). आमच्यांत द्रव्यार्जनाची योग्यता नसेल तरी तीहि आम्हांस देऊन मगच द्रव्य दे म्हणजे अपात्रीं दान केलें असें व्हावयास नको असें एक कवि इन्द्राला विनवतो.

**किमङ्ग त्वा मघवन्भोजमाहुः शिशीहि मा शिशयं त्वा शृणोमि ।**

अर्थ : '(आमच्यांत योग्यता नाहीं म्हणून आम्हांस तूं देणार नसल्यास) तुला "भोज" असें कशाला म्हणतात? माझ्यांत घासून पुसून (धनार्जनाची) योग्यता निर्माण कर; मी असें ऐकतों कीं, तुला अशी योग्यता निर्माण करतां येते.' (१०.४२.३). आणखी इन्द्राच्या संबंधांतच पुढील उतारा पाहा :

**एवा हि त्वामृतुथा यातयन्तं मघा विप्रेभ्यो ददतं शृणोमि ।**
**किं ते ब्रह्माणो गृहते सखायः ये त्वाया निदधुः काममिन्द्र ॥**

अर्थ : 'मी असें ऐकतों कीं, तूं योग्य वेळीं भक्त कवींना उत्तेजन देऊन

त्यांना मोठमोठ्या देणग्याहि देतोस. मग हे तुझे आवडते ऋषी—ज्यांनीं तुझ्यावरील प्रेमामुळें आपल्या इच्छापूर्तीचा सर्व भार तुझ्यावर टाकला आहे—त्यांनीं काय मिळविलें आहे?' (५.३२.१२). (त्यांना तूं काय दिलें आहेस? सर्वांना देतोस असें लोक म्हणतात; मग तुझे प्रेमळ सखे जे आम्ही त्यांना अधिक आस्थेनें द्यावयास नको काय असा विचारण्याचा भावार्थ.) इन्द्रासंबंधींचा कवीचा एकनिष्ठपणा हाहि त्याच्या आत्मनिवेदनाचाच एक प्रकार आहे. कवि म्हणतो :

**यन्न इन्द्रो जुजुषे यच्च वष्टि तन्नो महान्करति शुष्म्या चित् ।**

अर्थ : 'जें जें आमच्यासंबंधानें इन्द्राला आवडेल व ज्या ज्या गोष्टीची तो इच्छा करील तें तें सर्व तो महाबलाढ्य इन्द्र घडवून आणील.' (४.२२.१). इन्द्रावांचून दुसऱ्या कोणाचीहि स्तुति आपण करूं इच्छीत नाहीं, असें कवि पुढील ऋचेंत सांगतो :

**वयमु त्वा तदिदर्था इन्द्र त्वायन्तः सखायः ।**
**कण्वा उक्थेभिर्जरन्ते ॥ १६ ॥**
**न घेमन्यदा पपन वज्रिन्नपसो नविष्टौ ।**
**तवेदु स्तोमं चिकेत ॥ १७ ॥**

अर्थ : 'आम्ही म्हणजे हे कण्व, तुझे आवडते एकनिष्ठ सखे, हाच एक छंद घेऊन आपल्या स्तोत्रांनीं तुझी स्तुति करीत असतात. माझ्या कविकर्मांच्या दर नवीन उन्मेषाबरोबर मीं दुसऱ्या कुणाचेंहि वर्णन केलेलें नाहीं. हे वज्रिन्, केवळ तुझेंच स्तोत्र करणें मला जमतें.' (८.२.१६-१७). तसेंच :

**नू अन्यत्रा चिदद्रिवः त्वन्नो जग्मुराशसः ।**
**मघवन् शग्धि तव तन्न ऊतिभिः ॥**

अर्थ : 'हे अद्रींच्या धन्या, आमच्या याचना तुझ्यावांचून दुसऱ्या कोणाजवळहि केलेल्या नाहींत; म्हणून हे मघव्या, तूं आम्हांला आपल्या कृपा-

प्रसादांनीं समर्थ कर.' (८.२४.११). ज्याप्रमाणें संतभक्तांच्या कल्पनेतील विठोबा कितीहि भक्तांनीं येऊन त्याच्या पायांवर डोकें घासलें, रात्र रात्र भजन करून कपाळ उठवलें तरी केव्हांहि कंटाळत नाहीं, त्रासत नाहीं, रागावत नाहीं, उलट त्याला त्यांतच सुख वाटते तीच गोष्ट इन्द्राचीहि आहे. पाहा :

**सं च त्वे जग्मुर्गिर इन्द्र पूर्वीः वि च त्वद्यन्ति विभ्वो मनीषाः ।**
**पुरा नूनं च स्तुतय ऋषीणां पस्पृध्र इन्द्रे अध्युक्थार्का ॥ १ ॥**
**न यं हिंसन्ति धीतयो न वाणीः इन्द्रं नक्षन्तीदभि वर्धयन्तीः ।**
**यदि स्तोतारः शतं यत्सहस्रं गृणन्ति गिर्वणसं शं तदस्मै ॥ ३ ॥**

अर्थ : 'अनेक मातबर स्तोत्रें तुझ्याजवळ एकत्रित होऊन पुन्हा आल्या वाटेनें आपापल्या ठिकाणीं परत निघून जातात. पूर्वकाळीं तसेंच आतांसुद्धां ऋषींचीं स्तोत्रें, गीतें, मंत्र वगैरे इन्द्राजवळ पोंचण्यासाठीं ईर्ष्येनें धडपड करीत असतात. विचारपूर्वक रचलेलीं स्तोत्रें व मंत्र त्याला बिलकूल त्रासदायक वाटत नाहींत. तीं सर्व त्याचा जयजयकार करीत त्याला बिलगतातच. शेंकडों—नव्हे, हजारों—भक्तांनीं जरी एकाच वेळीं या स्तुतिप्रिय इन्द्राचें स्तवन केलें तरी तें त्याला सुखदायकच वाटतें.' (६.३४.१,३). 'न मे भक्तः प्रणश्यति' म्हणून जशी श्रीकृष्णाची प्रतिज्ञा तशीच इन्द्राचीहि प्रतिज्ञा आहे. तसेंच त्याला लहानमोठे, शूर-भित्रे वगैरे सर्व प्रकारच्या लोकांनीं हाक मारावी; तो सर्वदैव त्यांच्या मदतीस धावून जातो. पाहा :

**यः शूरेभिर्हव्यो यश्च भीरुभिर्यो धावद्भिर्हूयते यश्च जिग्युभिः ।**

अर्थ : 'ज्या इन्द्राला शूर मर्दांनीं त्याचप्रमाणें भित्र्या भागूबाईंनींहि पाचारण करावें; रणांगणांतून पळून जाणारे योद्धे ज्याप्रमाणें त्याचा धावा करतात, तसाच जगज्जेते वीरहि त्यालाच हाक मारतात.' (१.१०१.६). पृथ्वीतलावर उभा राहून गर्जना करून इन्द्र सर्वांना सांगतो :

**स रोरुवद्वृषभस्तिग्मशृङ्गो वर्ष्मन् तस्थौ वरिमन्ना पृथिव्याः ।**

**विश्वेष्वेनं वृजनेषु पामि यो मे कुक्षी सुतसोमः पृणाति ॥**

अर्थ : 'तीक्ष्ण शिंगाच्या बैलाप्रमाणें बलाढ्य असलेला तो इन्द्र गर्जना करून पृथ्वीच्या शिखरावर उभा राहिला (व म्हणाला :) "जो पुरुष सोम अर्पण करून मला तृप्त करतो त्याला मी या पृथिवीच्या विस्तीर्ण पृष्ठावर कोठेंहि वाटेल तीं संकटें आलीं तरी त्या सर्वांतून निभावून नेईन." (१०.२८.२). तसेंच—

**अहमिन्द्रो न परा जिग्य इद्धनं न मृत्यवेऽव तस्थे कदाचन ।**
**सोममिन्मा सुन्वन्तो याचता वसु न मे पूरवः सख्ये रिषाथन ॥**

अर्थ : 'मी हा इन्द्र माझ्या (पणास लावलेल्या) धनाची केव्हांहि हार खात नाहीं; तसेंच कोणत्याहि प्रसंगीं मी मृत्यूला बळी पडलों नाहीं. हे मानवांनो, निव्वळ सोमच माझ्यासाठीं पिळून इच्छेला येईल तें द्रव्य माझ्याजवळ मागा. माझ्या सख्याची पांखर तुमच्यावर असेपर्यंत तुमच्या केसालाहि धक्का लागणार नाहीं.' (१०.४८.५). आणखी एकच उतारा देतों :

**शास इत्था महाँ असि अमित्रखादो अद्भुतः ।**
**न यस्य हन्यते सखा न जीयते कदा चन ॥**

अर्थ : 'अशा तऱ्हेनें तूं महान् शास्ता आहेस, व अभूतपूर्व असा शत्रूंचा संहारक आहेस; त्या तुझा सखा केव्हांहि मारला जात नाहीं अगर त्याला कोणी कधींच जिंकूं शकत नाहीं.' (१०.१५२.१). असो. इन्द्राची आपल्या भक्तगणांत मिसळून गाण्याची हौस वर परिच्छेद ९ मध्यें नमूद केलीच आहे. श्रीभागवतपुराणांत वर्णन केलेल्या नवविधा भक्तीपैकीं पादवन्दन व नामसंकीर्तन याविषयींचे उल्लेखहि ऋग्वेदांत क्वचित् आढळतात. पाद-वन्दनाचे पुढील दोनच उल्लेख सांपडतात :

**श्रिये ते पादा दुव आ मिमिक्षुः ॥**

अर्थ : 'सौभाग्यासाठीं भक्त लोक तुझ्या चरणांवर आपली सेवा अर्पण करतात.' (६.२९.३). तसेंच—

**ऋष्वा ते पादा प्रयज्जिगासि अवर्धन् वाजा उत ये चिदत्र ।**

अर्थ : 'हे इन्द्रा, ज्या अर्थी तूं (भक्तांकडे) त्वरेनें जातोस त्या अर्थीं तुझे पाय अत्युच्च म्हणजे श्रेष्ठ दर्जाचे आहेत. अशा वेळीं (आमच्या या यज्ञांत अर्पण केलेले) तुझे हविर्भाग व येथेंच (म्हणजे या यज्ञांतच गायिले जाणारे स्तोम वगैरे) जे जे कांहीं (अन्य) उपचार आहेत त्यांनीं त्यांची म्हणजे तुझ्या पायांची महती वाढविली आहे.' (१०.७३.३). नामसंकीर्तनाचा अत्यंत सूक्ष्म असा उगमहि ऋग्वेदांत खालील ऋचांतून पाहावयास सांपडतो :

**कस्य नूनं कतमस्यामृतानां मनामहे चारु देवस्य नाम ।**

अर्थ : 'अमरणधर्मे असे जे देव त्यांच्यापैकीं कितव्या व कोणत्या देवाच्या सुन्दर नांवाचें आम्हीं स्मरण करावें बरें?' (१.२४.१). तसेंच—

**अमन्महि मरुतां नाम भद्रम् ।**

अर्थ : 'आम्हीं मरुद्गणांच्या मंगल अशा नामाचें स्मरण केलें आहे.' (४.३९.४). या दोनहि उताऱ्यांत 'नाम' हा शब्द 'मन्' या धातूबरोबर उपयोजिलेला आहे. पुढील उताऱ्यांत त्याच शब्दाचा उपयोग 'वच्' या धातूबरोबर केला आहे :

**न ते गिरो अपि मृष्ये तुरस्य न सुष्टुतिमसुर्यस्य विद्वान् ।**
**सदा ते नाम स्वयशो विवक्मि ॥**

अर्थ : 'अत्यंत पराक्रमी व विजयशाली असा जो तूं त्या तुझीं स्तोत्रें गाण्यांत अगर सुंदर स्तुति पठन करण्यांत मीं जाणूनबुजून हलगर्जीपणा केलेला नाहीं. तर, हे स्वाधीनकीर्ते इन्द्रा, मी नेहमींच तुझ्या नांवाचा उच्चार करीत असतों.' (७.२२.५).

त्याचप्रमाणें—

**कीर्तेन्यं मघवा नाम बिभ्रत् ॥**

अर्थ : 'कीर्तन करण्यास योग्य असें नाम धारण करणारा मघवा.'

(१.१०३.४). इत्यादि. अशीच गोष्ट रुद्राच्या बाबतींतहि आढळते.

**गृणीमसि त्वेषं रुद्रस्य नाम ।**

अर्थ : 'आम्ही रुद्राच्या जाज्वल्य नांवाचा जयजयकार करतों.' (२.३३.८). तथापि पुढील कालखंडांत कर्ममार्ग व ज्ञानमार्ग यांच्या उत्कर्षामुळें भक्तिमार्ग साहजिकच मागें पडला व त्यामुळें भक्तीचे प्रकारहि, वेदोत्तरकालांत त्यांचें पुनरुज्जीवन होईपर्यंत, साफ मागें पडले.

१५. वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं, इन्द्र आणि त्याचे स्तोते अथवा भक्त यांचा संबंध बाजारी स्वरूपाचा नसून भक्ताला देवाबद्दल आणि देवाला भक्ताबद्दल एक तऱ्हेची आपुलकी, एक तऱ्हेचा जिव्हाळा वाटत होता. वेदकालोत्तर अथवा अर्वाचीन संतभक्त यांची आपल्या देवाजवळची वृत्ति व भावना आणि इन्द्राच्या वैदिक भक्तांची त्याच्यासंबंधाची वृत्ति व भावना यांत मूलग्राही असा फारसा फरक नाहीं. आणि जो कांहीं फरक आहे तो भक्तीच्या साध्याच्या म्हणजे पुरुषार्थाच्या कल्पनेंतील फरकाच्या अनुरोधानेंच झालेला आहे हेंहि उघड आहे. दैवतावर सर्वस्वीं अवलंबून त्याच्यावर निर्हेतुक व निरतिशय प्रेम अशा स्वरूपाची भक्ति वेदांमध्यें आढळेल अशी अपेक्षा करणेंच चुकीचें होईल. कारण अशा भक्तीला ऐहिक व पारमार्थिक सुखोपभोगांबद्दल वैराग्य व अनासक्ति असणें अत्यंत आवश्यक आहे. इतर कोणत्याहि भोग्य वस्तूपेक्षां आपलें उपास्यदैवत श्रेष्ठ आहे, केवळ त्याच्या सेवेपासूनच निर्भेळ आनंद व सौख्य प्राप्त होतें, अशा तऱ्हेची श्रद्धा व धारणा असल्यावांचून निष्काम व निरतिशय भक्ति हृदयांत निर्माण होणें कठिण. परंतु अशी बुद्धीची श्रद्धा व धारणा व्हावयास तिला एक तर आध्यात्मिक तत्त्वज्ञानाची जोड असावी लागते, नाहींतर संसारांतील त्रिविध तापांनीं प्रत्यक्ष अगर काल्पनिक रीतीनें होरपळून निघून माणसाला देवाच्या भक्तीची

चटक लागावी लागते. ब्रह्म हें मूलभूत तत्त्व असून त्याचींच भिन्नभिन्न रूपें म्हणजे इन्द्रवरुणादि देव आहेत अशा तऱ्हेची कल्पना ऋग्वेदीय मन्त्रांत बहुधा सर्व मंडलांतून अनुस्यूत आहे व म्हणूनच कोणत्याहि प्रमुख देवतेची स्तुति करतांना सर्वश्रेष्ठतेचीं सर्व अगर मुख्य मुख्य लक्षणें त्या त्या देवतेला लाविलीं जातात. विश्वाची उत्पत्ति, धारण, पोपण वगैरेची जबाबदारी बहुधा प्रत्येक प्रमुख देवतेवर लादलेली त्या त्या देवतेच्या स्तुतिपर मंत्रांत आढळते व वरील तात्त्विक एकत्वाची अनुस्यूति लक्षांत घेतां अशा तऱ्हेची एकाच जातीची मोठेपणाबद्दलची स्तुति निरनिराळ्या देवतांना अर्पण करण्यांत वैदिक ऋषींनीं केवळ तोंडपुजेपणा केला आहे अथवा गंगा गये गंगादास, जमना गये जमनादास अशा वृत्तीचें प्रदर्शन केलें आहे असें वाटण्याचें कारण नाहीं. तथापि या तात्त्विक ऐक्याबरोबरच ऐहिक जीवनाचा फोलपणा, अशाश्वतपणा, दुःखमयत्व, जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून अनेकवार भ्रमण वगैरे निर्वेद व वैराग्य उत्पन्न करणाऱ्या गोष्टींबद्दल वैदिक मंत्रांत मुग्धताच स्वीकारलेली आढळते. उलटपक्षीं त्यांत ऐहिक जीवनाबद्दल व त्यांतील उपभोग्य वस्तूंबद्दल पराकाष्ठेची आस्थाच दिसून येते. आपल्याला अथवा आपल्या यजमानाला आपल्या आर्य किंवा अनार्य शत्रूंशीं—प्रतिस्पर्ध्यांशीं निरंतर झगडावें लागतें व अशा झगड्यावांचून जीवनाला अत्यावश्यक असलेल्या अशा वस्तू देखील मिळणें दुरापास्त आहे अशा तऱ्हेची समजूत बहुतेक कवींच्या प्रार्थनेच्या मुळाशीं असलेली आढळते. अशा परिस्थितींत प्राचीन भारतीयांच्या बुद्धीला प्राप्त झालेलें तत्त्वज्ञान देखील 'स्वस्थे चित्ते बुद्धयः संभवन्ति' या न्यायानें फारशी प्रगति करूं शकलें नाहीं. म्हणून ऋग्वेदसूक्तांतून ऐहिक जीवनाविषयीं निर्वेद अथवा वैराग्य बहुधा कोठेंच दिसून येत नाहीं. तसेंच मरणानंतरच्या जीवनाचाहि फारसा खेदजनक विचार त्यांत आढळत नाहीं.

उपनिषत्कालांतहि ऐहिक जीवनाच्या मिथ्यात्वाचा, विफलपणाचा, निःसारत्वाचा वगैरे पूर्ण ऊहापोह झाला. परंतु त्या कालींसुद्धां ऐहिक जीवन दुःखपूर्ण, बंधमय, अतएव त्याज्य आहे अशा कल्पनेचा सर्रास फैलाव झालेला नाहीं. या कल्पनेचा समाजाच्या खालच्या टोकापासून वरच्या टोकापर्यंत प्रसार करण्याचें श्रेय बहुतांशीं जैन व बौद्ध धर्मांच्या प्रचारकांचेंच आहे यांत शंका नाहीं. तात्पर्य, ऋग्वेदांतील मंत्रद्रष्टे ऐहिक जीवनापासून पराङ्मुख होऊन केवल देवतेच्या भक्तींतच सुखसर्वस्व व मानवी जीवनाची ध्येयपूर्ति आहे असें मानावयास लागले नव्हते. ईश्वरभक्ति हें त्यांच्या दृष्टीनें ऐहिक जीवनांतील साफल्याचें एक प्रमुख साधन होतें; व म्हणूनच त्यांची भक्ति निर्हेतुक व निरतिशय प्रेम अशा स्वरूपाची असणें शक्य नव्हतें. याच्या उलट वेदोत्तरकालीं व विशेषतः अर्वाचीन व मध्ययुगीन कालांतील वैष्णव संत व भक्तांच्या दृष्टीनें ऐहिक जीवन दुःखमय, बंधनकारक असें असल्यामुळें उपास्यदैवत व त्याच्यावरील नितान्त अनुराग एवढें एकच ध्येय त्यांच्यापुढें राहिल व त्यांची देवतेवरील भक्ति निःसीम व अनन्यसाधारण अशी झाली. निष्काम अथवा आत्यंतिक भक्ति ऋग्वेदसूक्तांत न आढळण्याचें आणखी एक महत्त्वाचें कारण आहे. ज्या आराध्य दैवताची आत्यंतिक भक्ति करावयाची त्याचें तात्त्विक अगर मानीव स्वरूप इन्द्रियगम्य असलें पाहिजे. त्याची मूर्ति (काल्पनिकच कां असेना)—त्याचें चित्र—त्याचें प्रतीक डोळ्यांनीं पाहण्याजोगें असलें पाहिजे. त्याचें वर्णन वाणीला करतां आलें पाहिजे, त्याला आपल्याला स्पर्श करतां आला पाहिजे, तरच त्या देवावर परा अनुरक्ति अशा स्वरूपाची भक्ति करतां येणें शक्य आहे. इन्द्रियांची स्वाभाविक प्रवृत्ति आपापल्या विषयांकडे असते. या स्वाभाविक प्रवृत्तींतच मनुष्याच्या रागाचें अगर द्वेषाचें बीज आहे. आणि राग व द्वेष हे तर मनुष्याचे मोक्षमार्गांतील मोठे शत्रू आहेत. पाहा :

**इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**
**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥**

अर्थ : ‘प्रत्येक इन्द्रियाचे आपापल्या विशिष्ट विषयांवर राग आणि द्वेष हे व्यवस्थित आहेत म्हणजे विषयाच्या अनुकूलतेनें त्याच्यांत त्या विषयाबद्दल राग उत्पन्न होतो व प्रतिकूलतेनें द्वेष उत्पन्न होतो. परंतु मनुष्यानें त्या दोघांच्याहि आधीन होऊं नये; कारण ते दोघेहि याचे म्हणजे मनुष्याचे भयंकर वैरी आहेत.’ (भगवद्गीता ३.३४). म्हणून या विषयांपासून त्यांना निवृत्त केलें नाहीं तर मनुष्याला चिरकालिक शांति मिळणार नाहीं. परंतु इन्द्रियांना त्यांच्या विषयापासून निवृत्त करणें किंवा विषयांपासून उत्पन्न होणाऱ्या रागद्वेषांतून मुक्त करणें हें अत्यंत अवघड काम आहे. सामान्य माणसाला हें जवळ जवळ अशक्यच आहे. कठोपनिषदांत अध्याय २, वल्ली १, श्लोक १ यांत म्हटल्याप्रमाणें एकादाच मनुष्य इन्द्रियांच्या स्वाभाविक प्रवृत्तीच्या या प्रवाहाच्या उलट जाऊन प्रत्यगात्म्याचें ज्ञान करून घेतो. पाहा :

**पराञ्चि खानि व्यतृणत्स्वयंभूः तस्मात्पराङ् पश्यति नान्तरात्मन् ।**
**कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षत् आवृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन् ॥**

अर्थ : ‘स्वयंभू म्हणजे ब्रह्मदेव यानें प्राणिमात्रांचीं इन्द्रियें पुरोगामी म्हणजे नेहमीं पुढें पुढें जाणारीं अशीं (एकाद्या नदीचा कालवा काढतात त्याप्रमाणें खणून) निर्माण केलीं, त्यामुळें प्रत्येक प्राणी स्वाभाविकपणें पुढेंपुढेंच पाहतो (म्हणजे प्रत्येक इन्द्रिय आपापल्या बाह्य विषयाकडेच प्रवृत्त होतें). तथापि, क्वचित् एकादा बुद्धिमान् दृढनिश्चयी पुरुष अमरत्वाची इच्छा करून, डोळ्यांना म्हणजे सर्व इन्द्रियांना मागें वळवून, प्रत्यगात्म्याचें दर्शन घेऊं शकतो.’ वास्तविक इन्द्रियांची अशी आपापल्या विषयांकडे प्रवृत्ति होणें ही गोष्ट बंधनकारक नाहीं. या प्रवृत्तीपासून उत्पन्न होणारे रागद्वेषादि विकार हेच बंधनकारक आहेत. पाहा :

**ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।**
**संगात्संजायते कामः कामात्क्रोधोभिजायते ॥ ६२ ॥**
**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥**

अर्थ : 'इन्द्रियांच्या विषयांकडील स्वाभाविक प्रवृत्तीनंतर त्या त्या विषयाबद्दल चिरकालिक ध्यान ही पुढची स्वाभाविक पायरी आहे. याच ध्यानांतून आसक्ति, तिच्यांतून उत्कट इच्छा, ती पूर्ण न झाल्यामुळें क्रोध (पूर्ण झाली तर अधिक लोभ), क्रोधामुळें (अगर लोभामुळें) बुद्धीला भुरळ, व तिच्यामुळें संपादन केलेल्या सर्व ज्ञानाचा अगर अनुभवाचा संपूर्ण विसर आणि सरतेशेवटीं बुद्धीचाच नाश होऊन मनुष्याच्या सर्वस्वाची हानि होते.' (२.६२,६३). परंतु विषयाच्या या ध्यानापासून होणारी ही अनर्थपरंपरा टाळतां आली तर मात्र इन्द्रियांच्या विषयाकडील स्वाभाविक प्रवृत्तीपासून कांहींहि अपाय होण्याचा संभव नाहीं; व ही टाळण्याचे दोनच उपाय. एक म्हणजे अनासक्तियोग व दुसरा म्हणजे ईश्वरासक्तियोग. पहिल्याचें नांव सांख्य अगर ज्ञानमार्ग व दुसऱ्याचें नांव योग अथवा भक्तिमार्ग. विषयांकडे प्रवृत्ति होत असतां त्यांच्याबद्दल रागद्वेषरहित राहणें हें वैराग्य व अभ्यास यांनींहि दृढकष्टसाध्य आहे. परंतु याच प्रवृत्तीचा उपयोग अनर्थावह नाहींत अशीं ध्यान व आसक्ति निर्माण करण्यांत करून घेतां आला तर मात्र कांहीं कष्ट न होतां हसत खेळतच माणसाला पुरुषार्थ म्हणजे चिरकालिक शांति व आनंद प्राप्त करून घेतां येतात. जसें दारूचें व्यसन सोडविण्याचे दोन मार्ग : एक म्हणजे मुळींच कांहीं न पिणें व दुसरा म्हणजे दारूसारखेंच रुचि व आनंद देणारें परंतु अनर्थावह नाहीं असें कांहीं तरी पिणें. हा दुसरा मार्ग अत्यंत सोपा व कष्ट न पाडणारा असल्यामुळें आबालवृद्धांना मोकळा आहे. डोळ्यांची अनर्थावह रूपावरील आसक्ति दूर करावयाची असेल तर त्यांना तितक्याच सुंदर परंतु अनर्थावह

नसलेल्या रूपाकडे वळविणें हाच उत्तम उपाय आहे. हीच गोष्ट कानांची व इतर इन्द्रियांची. भक्तिमार्गाचें हेंच उद्दिष्ट आहे व त्यामुळें इन्द्रियांना कोणत्याहि तऱ्हेची पीडा न होतां अनर्थापासून त्यांचा बचाव होतो. हा भक्तिमार्गच श्रीकृष्णांनीं अर्जुनाच्या द्वारा सर्वसामान्य माणसाला उपदेशिला आहे. म्हणूनच ठिकठिकाणीं 'मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्' म्हणजे माझ्यावर मनाची आसक्ति ठेवून योगसाधन करीत, 'मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय' म्हणजे माझ्यावर (म्हणजे माझ्या सगुण साकार रूपावर) मन जडवून बुद्धीहि माझ्याकडे वळव, तसेंच इन्द्रियांचीं सर्व कर्मेंहि माझ्याकडे वळव, 'यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्। यत्तपस्यसि कौन्तेय तत् कुरुष्व मदर्पणम्॥' वगैरे उपदेश करून सरतेशेवटीं सर्व शंकाकुशंका बाजूला ठेवून, मी सर्वांत गुह्यतम अशी गोष्ट सांगतों ती ऐक, अशी प्रस्तावना करून श्रीकृष्ण भगवद्गीतेच्या शेवटीं दोन श्लोकांनीं अर्जुनाला (भ. गी. १८.६५-६६) हाच भक्तिमार्ग उपदेशितात. (पाहा: परिच्छेद ५ मधील या श्लोकांचें भाषांतर). तुकारामबुवांच्या 'डोळे तुम्ही घ्या रे सुख। पहा विठोबाचें मुख॥ तुम्ही आईका रे कान। माझ्या विठोबाचे गुण॥' वगैरे परिसंख्यात्मक उद्गारांचें तात्पर्यहि हेंच आहे. म्हणून या विवेचनाच्या प्रारंभीं म्हटल्याप्रमाणें निरतिशय प्रेम किंवा अनुरक्ति अशा जातीच्या भक्तीला ईश्वराच्या सगुण, साकार व सहजप्राप्य प्रतिमेची—प्रतीकाची—अपेक्षा असतेच. अशा तऱ्हेच्या ईश्वराच्या सगुण व साकार प्रतिमेवर—प्रतीकावर—भक्ताचीं सर्व इन्द्रियें, मन व बुद्धि केंद्रित झालीं पाहिजेत. अर्थात् मी आपल्या म्हणजे भारतीय आर्यांच्या सगुण भक्ती-संबंधानेंच बोलत आहें हें लक्षांत ठेवणें इष्ट आहे. ही भक्ति नवविधा आहे व हिचें वर्णन श्रीभागवत पुराणांत पुढीलप्रमाणें आहे:

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्।**
**अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्॥**

(७.५.२३). हे भक्तीचे सर्व प्रकार, उपास्यदैवत जर सगुण साकार असेल तरच शक्य आहेत हें निराळें सांगावयास नकोच. यासाठीं अशा तऱ्हेच्या प्रेमळ व आत्यंतिक भक्तीसाठीं ईश्वराच्या काल्पनिक सगुण मूर्तिमत्त्वाची अपेक्षा आहे हें उघड आहे. परंतु असें सगुण मूर्तिमत्त्व पूर्ण व निश्चित स्वरूपांत वैदिक देवतांना अद्यापि म्हणजे ऋग्वेदकालांत लाभलेलें नव्हतें. वैदिक दैवतांच्या अत्यंत आवश्यक म्हणजे प्रार्थनेच्या अगर कर्तृत्वाच्या दृष्टीनें जरूर असलेल्या कांहीं अवयवांची—डोळे, कान, पोट, हात, तोंड इत्यादिकांची—कल्पना ऋग्वेदसूक्तांतून स्पष्टपणें दिसून येते. तथापि पूजा, ध्यान वगैरे सेवा व उपचार यांच्या दृष्टीनें आवश्यक असलेली त्यांची एकत्रित व संपूर्ण मूर्ति अथवा प्रतिमा मात्र अद्यापि वैदिक ऋषींनीं प्रस्थापित केली नव्हती. ऋग्वेदोत्तर कालांत ती कदाचित् स्थापित झाली असती; परंतु कर्माला व आत्मज्ञानाला अनुक्रमानें ब्राह्मणकालीं व उपनिषत्कालीं प्राधान्य लाभल्यामुळें अशा तऱ्हेची प्रगति होऊं शकली नाहीं, व मूर्तिपूजेच्या कल्पनेचा संपूर्ण आविष्कार वेदोत्तरकालापर्यंत स्थगितच राहिला. म्हणूनच वैदिक वाङ्मयाच्या तिन्ही कालखंडांत मूर्तिपूजेचा कांहींहि मागमूस लागत नाहीं.

१६. चौथ्या मंडलांतील एका मंत्रावरून कांहीं पाश्चात्य व तदनुषंगानें कांहीं भारतीय विद्वान् मूर्तिपूजेचें वेदकालीन अस्तित्व सिद्ध करूं पाहतात, परंतु तें युक्तियुक्त नाहीं हें पुढील विवेचनावरून दिसून येईल. सदरहू मंत्र चौथ्या मंडलाच्या २४ व्या सूक्तांत १० वा आहे. या सूक्तांतील ८, ९ व १० या ऋचा अगर मंत्र प्रस्तुत विषयाच्या विवेचनाला फार महत्त्वाच्या आहेत. तथापि प्रारंभींच्या कांहीं ऋचाहि—विशेषतः तिसरी ऋचा—प्रकरणासाठीं विचारांत घेणें आवश्यक आहे. तिसऱ्या ऋचेंत कवि म्हणतो :

**तमिन्नरो वि ह्वयन्ते समीके रिरिक्वांसस्तन्वः कृण्वत त्राम्।**
**मिथो यत्त्यागमुभयासो अग्मन् नरस्तोकस्य तनयस्य सातौ ॥**

अर्थ : ' ज्या वेळीं योद्धे आपल्या संततीच्या अभिवृद्धयर्थ रणांगणावर देह ठेवण्याच्या तयारीनें व ईर्ष्येनें (देवतांना) हविर्भाग अर्पण करतात त्या वेळीं दोन्ही बाजूचे लोक त्यालाच (इन्द्रालाच) आपापल्या परीनें बोलावतात व त्यालाच आपला त्राता करतात. ' अर्थात्च ज्या बाजूचा हविर्भाग जास्त चांगला, विपुल व अंतःकरणपूर्वक असेल तिकडेच इन्द्र जाणार अशी सर्वांची अपेक्षा असल्यामुळें अशा वेळीं इन्द्राच्या लाडक्या पुरोहिताला यज्ञाचा अध्वर्यु म्हणून पाचारण करण्यासाठीं दोन्ही बाजूंच्या योद्धयांचा प्रयत्न चालू असणार हें उघडच आहे. म्हणून ज्या एका विशिष्ट प्रसंगाचें वर्णन या सूक्तांत आहे त्या प्रसंगीं वामदेवासारख्या इन्द्राच्या अत्यंत आवडत्या पुरोहिताला आपापल्या बाजूला वळवून घेण्याची चुरशीची खटपट दोन्ही बाजूंनीं चालू ठेविली होती. या प्रसंगाचें नाट्यपूर्ण वर्णन कवीनें ऋचा ८ ते १० यांत केलें आहे :

**यदा समर्यं व्यचेदृघावा दीर्घं यदाजिमभ्यख्यदर्यः ।**
**अचिक्रदद्वृषणं पत्न्यच्छा दुरोण आ निशितं सोमसुद्भिः ॥ ८ ॥**
**भूयसा वस्नमचरत् कनीयो अविक्रीतो अकानिषं पुनर्यन् ।**
**स भूयसा कनीयो नारिरेचीत् दीना दक्षा वि दुहन्ति प्र वाणम् ॥ ९ ॥**
**क इमं दशभिर्मम इन्द्रं क्रीणाति धेनुभिः ।**
**यदा वृत्राणि जङ्घनत् अथैनं मे पुनर्ददत् ॥ १० ॥**

अर्थ : ' ज्या वेळीं त्या तापट इन्द्राच्या युद्ध लवकरच होणार हें लक्षांत आलें व जेव्हां तो आमच्या शत्रूनें देऊं केलेली देणगी (आजिं) पुष्कळ वेळपर्यंत नुसती पाहातच राहिला व नंतर लवकरच (माझ्या) घरीं येऊन आमच्या सोम गाळणाऱ्या ऋषींच्या सोमानें उत्तेजित होऊन राहिला त्या वेळीं त्याची पत्नी त्याला (त्याच्या या विचित्र वागणुकीबद्दल)

ओरडून विचारूं लागली. (तेव्हां तिला इन्द्रानें उत्तर दिलें :) त्यानें (म्हणजे वामदेवाच्या यजमानाच्या शत्रूनें अगर त्याच्या पुरोहितानें) मोठी व भारी किंमतीची वस्तु ध्यावयास पाहून हलक्या किंमतीची लहान वस्तु मला देऊं केली होती ! परंतु सौदा न पटवतांच तेथून परत फिरणें मीं पसंत केलें. तरीहि त्यानें लहान वस्तू मागें घेऊन मोठी वस्तु तिच्या जागीं पुढें केलीच नाहीं. (म्हणून मी त्याच्याकडे पाठ फिरवून वामदेवाच्या बाजूस वळलों.) भिकार बुद्धीचीं माणसें चांगल्या मूल्यवान् वस्तूचा असाच दुरुपयोग करूं पाहतात ! (किंवा, वेणूलाच आंचूळ समजून त्यांतून दूध काढूं पाहतात !) (नंतर स्वतः कवि यावर म्हणतात :) हा कोण शहाणा दहा गाई बदली देऊन माझ्या इन्द्राला विकत घेऊं पाहात आहे ? (या इन्द्राला मी कायमचा विकणें कधींच शक्य नाहीं.) ज्या वेळीं इन्द्र (माझ्या यजमानाच्या) शत्रूंचा पुरा निःपात करील त्या वेळीं (माझ्या यजमानानें) माझा इन्द्र मला परत केला पाहिजे. या ऋचांत कवीच्या कल्पनेप्रमाणें वामदेवाच्या यजमानाच्या विरुद्ध लढणाऱ्या प्रतिपक्षानें इन्द्राला म्हणजे पर्यायानें वामदेवाला देऊं केलेली देणगी लोभनीय आहे असें वाटल्या-वरून इन्द्राच्या पत्नीनें इन्द्राला हाक मारून त्याबद्दल ती त्याला विचारणार इतक्यांत तिला इन्द्र विरुद्ध बाजूच्या म्हणजे वामदेवाच्या यजमानाच्या यज्ञवाटांत जाऊन तेथें वामदेवाच्या सोम पिळणाऱ्या ऋषींनीं दिलेला सोमरस पीत असतांना आढळला. पत्नीचा गोंधळ लक्षांत घेऊन इन्द्रानें उत्तर दिलें कीं, हा तुझा राजा दरिद्री आहे. त्यानें मला म्हणजे पर्यायानें माझ्या वामदेवाला देऊं केलेली देणगी अत्यल्प आहे व ती तो वाढ-विण्यासहि तयार नाहीं, उलट मोठ्या वस्तूसाठीं लहान देणगी पुढें करून घासाघीस करीत बसतो. म्हणून आम्ही त्याच्या बाजूला न जातां दुसऱ्या बाजूला जाणें पसंत केलें. ही लहान देणगी म्हणजे १० गाईंची दक्षिणा असावी असें वामदेवाच्या पुढील ऋचेंतील उक्तीवरून दिसतें. या

ऋचेंतील ‘क्रीणाति’ हा शब्द व ‘अविक्रीतः’ हा पूर्वीच्या ऋचेंतील शब्द हे दोन्ही ‘संपूर्ण विक्री’ या अर्थानें वापरलेले नाहींत हें १० व्या ऋचेच्या उत्तरार्धावरून अगदीं स्पष्ट आहे. हा देवघेवीचा व्यवहार फक्त चालू युद्धापुरताच आहे. त्यांत इन्द्राकडून शत्रूचा संहार करवून घेतल्यावर त्यानंतर इन्द्र व वामदेव स्वतंत्र आहेत, त्या यजमानाचे कायमचे बांधलेले नाहींत, असें वामदेव आपल्या प्रस्तुतच्या यजमानाला या ऋचेच्या उत्तरार्धांत बजावीत आहे. वामदेवाला १० गाईंची लहानशी दक्षिणा देऊन त्याच्या मोबदल्यांत त्याला व इन्द्राला कायमचाच आपल्या बाजूला राखून ठेवण्याचा म्हणजे वामदेवाला राजपुरोहित म्हणून कायमचा ठेवून घेण्याचा एकाद्या राजाचा हा डाव असावा व तो वामदेवानें ओळखून त्याला उत्तर म्हणून १० व्या ऋचेंतील पूर्वार्ध रूपानें ‘क इमं’ हा तुच्छतादर्शक प्रश्न केला, असें वाटतें. ‘क इमं’ हा प्रश्न पूर्ण नकारार्थी उत्तराची अपेक्षा करूनच केलेला आहे. नाहींतर इन्द्राचा लिलावासारखा सार्वजनिक विक्रय वामदेवानें मांडला व तो देखील १० गाई घेऊन असें विचित्र अनुमान करावें लागेल. या ठिकाणीं इन्द्राची मूर्ति करून वामदेव विकीत होता असें समजून कांहीं पंडितांनीं या परिच्छेदाच्या प्रारंभीं म्हटल्याप्रमाणें प्रयत्न केला आहे. परंतु याच ऋचेच्या उत्तरार्धावरून ही विक्री प्रत्यक्ष नसून काल्पनिक व गौण आहे असें सिद्ध होतें हें वर दाखविलेंच आहे. नाहींतर एकदां विकलेली मूर्ति परत केली पाहिजे असा अर्थ होईल. मग तो विक्रय कसला ? शिवाय अशा मूर्ती करून त्या काळीं ऋषी विकीत होते असें गृहीत धरलें तर मग अशा मूर्ति अनेक असल्या पाहिजेत व मोठमोठ्या ऋषींकडून अशा तऱ्हेच्या मूर्ती मंत्रसिद्ध करून सार्वजनिक रीत्या विकल्या गेल्या असल्या पाहिजेत असें मानणें भाग आहे. मग त्या मूर्ती परत मागणें हास्यास्पद ठरेल. एकट्या वामदेवालाच मूर्ति व तीहि एकच करतां येत होती आणि ती तो राजांना

कामापुरती भाड्यानें देत असे असें मानणेंहि सयुक्तिक नाहीं. शिवाय भाड्यानें घेतलेल्या मूर्तींचें राजे लोक काय करीत असत अशी कल्पना करावयाची ? ते तिला लढाईच्या वेळीं बरोबर नेत असत कीं घरींच पूजा करून ठेवीत ? घरींच पूजा करावयाची तर आपल्या घरीं नेऊन ठेवण्याचें प्रयोजन काय ? आजच्याप्रमाणें वामदेवाच्या घरीं जाऊन इन्द्राला नमस्कार करून भटजीच्या पुढें लठ्ठ दक्षिणा ठेवून लढाईवर जाणें योग्य नव्हतें काय ? असे अनेक प्रश्न पुढें उभे राहतात, व इन्द्राच्या मूर्तीचा उल्लेख वैदिक वाङ्मयांत, विशेषतः ऋग्वेदांत, इतरत्र कोठेंहि न आल्यामुळें त्यांपैकीं एकाचेंहि समाधानकारक उत्तर देतां येत नाहीं. याखेरीज 'क इमं' इत्यादि पूर्वार्धांतील प्रश्न नकारार्थी उत्तराची अपेक्षा असलेला व उपहासात्मकच असला पाहिजे याला इतर पुरावा देखील आहे. एक तर याच ऋचेंतील 'मम' (इन्द्रं) या शब्दानें 'अथैनं मे पुनर्दात्' या पुढील वाक्यावरून अगोदरच स्पष्ट असलेलें वामदेवाचें इन्द्रावरील (इन्द्राच्या मूर्तीवरील नव्हे) ममत्व व प्रभुत्व अधिक स्पष्ट होतें; व शिवाय हें प्रभुत्व इन्द्रावरील असून इन्द्राच्या मूर्तीवरील नव्हतें असें अशाच तऱ्हेच्या अन्य ठिकाणीं आढळणाऱ्या इन्द्राच्या काल्पनिक विक्रीच्या चर्चेवरून स्पष्ट दिसतें. अशी चर्चा आठव्या मण्डलांत १ ल्या सूक्ताच्या ५० व्या ऋचेंत आलेली आहे :

**महे चन त्वामद्रिवः परा शुल्काय देयाम् ।**
**न सहस्राय नायुताय वज्रिवो न शताय शतामघ ॥**

अर्थ : 'हे शेकडों देणग्या देणाऱ्या इन्द्रा, मी तुला मोठी किंमत घेऊन देखील कायमचा देऊन टाकणार नाहीं—शेकडों, हजारों, नव्हे, दहा हजार (वस्तु अगर गाई) घेऊन देखील देणार नाहीं !' या ऋचेंतील 'परा देयां' व वरील १० या ऋचेंतील 'क्रीणाति' हे दोन्ही शब्द एकाच म्हणजे काल्पनिक क्रयविक्रयाचे वाचक आहेत हें संदर्भा-

वरून स्पष्ट आहे. या दोन्ही उताऱ्यांत इन्द्राच्या प्रतिमेच्या विक्रीचा उल्लेख आहे असें मानणें न्यायाला अनुसरून होणार नाहीं. आणखी ऋग्वेदांत एका ठिकाणीं इन्द्राला देऊन टाकण्याच्या कल्पनेचा उल्लेख सांपडतो. मण्डल १, सूक्त १०२, ऋचा ६ चे उत्तरार्धांत कवि म्हणतो :

**अकल्प इन्द्रः प्रतिमानमोजसा अथा जना विह्वयन्ते सिषासवः ।**

अर्थ : 'आपल्या सामर्थ्याचे योगानें इन्द्र दुसऱ्या कोणाशीं बरोबरी करण्यासारखा नाहीं (म्हणजे तो अप्रतिम सामर्थ्यवान् आहे). म्हणूनच युद्धांत जयाची इच्छा करणारे योद्धे त्याला आपापल्या परीनें बोलावीत असतात.' याच्या पुढच्याच ऋचेंत कवि म्हणतो :

**उत् ते शतान्मघवनुच्च भूयसः उत्सहस्राद्रिरिचे कृष्टिषु श्रवः ।**
**अमात्रं त्वा धिषणा तित्विषे मही अधा वृत्राणि जिघ्नसे पुरंदर ॥**

अर्थ : हे मघवन्, तुझें लोकांतील यश शंभर, हजार अथवा अधिक (गाईंच्या) देणगीपेक्षां अधिक श्रेष्ठ आहे. आमच्या स्तोत्रांची महान् अधिष्ठात्री देवी जी धिषणा हिनें महापराक्रमी अशा तुला त्वेषयुक्त केलें आहे; आणि त्यामुळें, हे पुरंदरा, तूं आमच्या सर्व शत्रूंना ठार मारतोस.' या व वर उद्धृत केलेल्या दोन उताऱ्यांवरून इन्द्राच्या खऱ्याखुऱ्या म्हणजे इन्द्राच्या मूर्तीच्या विक्रयाचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. हा लाक्षणिक सौदा आहे; इन्द्र आपल्या भक्तांनीं अंतःकरणपूर्वक दिलेल्या देणगीचा व स्तुतीचा भोक्ता आहे व त्यांच्या भिडेस्तव त्यांनीं पुरस्कार केलेल्या योद्ध्यांना तो युद्धांत मदत करतो असा या उताऱ्यांचा सारांश आहे. जी प्रतिमापूजा वैदिक वाङ्मयांत इतरत्र कोठेंहि सर्रास प्रचारांत असलेली आढळत नाहीं ती या ऋग्वेदाच्या ऋचांत सांपडते असें म्हणणें धाडसाचें आहे. असो; तर मागील परिच्छेदांत म्हटल्याप्रमाणें आत्यन्तिक भक्तीला, परा अनुरक्तीला, नितान्त प्रेमाला विषय म्हणून आराध्यदेवतेला कांहीं तरी इन्द्रियगम्य असें काल्पनिक स्वरूप असलें पाहिजे. म्हणजे

देवता सगुण, साकार व मूर्तिमती असली पाहिजे. परंतु वैदिक वाङ्मयांत मूर्तिपूजेचा कांहींच उल्लेख मिळत नसल्यामुळें सगुण-साकार-मूर्तिपूजा त्या म्हणजे ऋग्वेदकालीं अस्तित्वांत नव्हती असें मानणें भाग आहे. हेंहि एक वेदकालीन भक्तीचें स्वरूप वेदोत्तरकालीन भक्तीच्या स्वरूपाहून भिन्न असण्याचें कारण आहे.

१७. निर्गुण निराकार देवाची आर्यांना परिचित व मान्य असलेली अशी भक्ति अति कठिण—जवळ जवळ अशक्यच—आहे. निर्गुण निराकार देव सर्वसाधारणपणें परोपदेशगम्य असल्यामुळें त्याच्याबद्दल मुख्यतः तीव्र जिज्ञासा, कौतुक, भीति, आदर वगैरे वाटेल. जें आपणांस दिसत नाहीं, ऐकूं येत नाहीं, ज्याच्या मोठेपणाची अगर क्षमाशीलत्वाची महती आपणांस लोकांकडूनच समजून ध्यावयाची त्या देवतेच्या भजनांत गोडी, परा अनुरक्ति उत्पन्न होणें महत्प्रयासाचें आहे. आपणां आर्यांच्या अत्युच्च भक्तीचें आणखी एक वैशिष्ट्य आहे. आपल्या देवाच्या कल्पनेंत व इतर धर्मांतील देवाच्या कल्पनेंत बराच फरक आहे. आमचा देव हा आईहि आहे व बापहि आहे. बापाप्रमाणें तो पालनकर्ता आहे, तर आईप्रमाणें तो अतिशय मायाळू आहे. म्हणून आपल्या कल्पनेप्रमाणें देवाबद्दल भीति, आदर, कौतुक वगैरे सर्व हळूहळू कमी होऊन त्याच्याबद्दल ज्या वेळीं निव्वळ प्रेम, निरतिशय आपलेपणा भक्ताला वाटेल त्याच वेळीं त्यानें भक्तीची परा कोटि गांठली असें आहे. निर्भीडपणा, लडिवाळपणा हें अनुरागाच्या आत्यंतिकत्वाची एक महत्त्वाची खूण आहे. स्वतःची अक्कल न फुटलेल्या लहान अर्भकाचें आपल्या आईवरील निःसीम प्रेम हें आमच्या अत्युच्च निःस्वार्थ भक्तीचें निदर्शन आहे. श्रीकृष्णावरील अतुल भक्तीच्या भरांत अर्जुनानें त्याला जवळचा सखा मानलें, त्याच्याशीं थट्टामस्करी केली याची जाणीव त्याला विश्वरूपदर्शनानंतर झाली ! तीहि तात्पुरतीच. स्त्रीला आपल्या मोठ्या विद्वान् अगर अधिकारी पतीबद्दल प्रथम आदर,

कौतुक वाटेल, परंतु ती त्याची विद्वत्ता, अधिकार वगैरे विसरेपर्यंत तिला त्याच्याबद्दल निःसीम प्रेम वाटणें अशक्य आहे. आदर व भीतीनें भक्त आपल्या उपास्यापासून दुरावतो, त्याला स्वतःच्या अल्पत्वाची व उपास्याच्या महत्त्वाची जाणीव सारखी टोचीत असते व त्यामुळें त्याच्या मनांत उपास्याबद्दल आत्यंतिक अनुराग—कीं जो आमच्या अत्युच्च भक्तीचें लक्षण आहे—उत्पन्न होणें जवळ जवळ अशक्य होतें. उलटपक्षीं अशा म्हणजे निर्भीड भक्तीनें भक्त आपल्या उपास्याच्या जवळ जातो; त्याच्या व आपल्यामधील अंतर व सर्व प्रकारचे भेद विसरतो, व त्याच्याशीं समरस होऊन अत्यंत श्रेष्ठ आनंदाचा उपभोग घेतो. यशोदा, राधा, गोप, गोपी, फार कशाला, आमचे संतभक्त नामदेव, तुकाराम इत्यादिकांनाहि श्रीकृष्णा-बद्दल अगर विठोबाबद्दल आदर, भीति वगैरे सारखींच वाटत राहिलीं असतीं तर त्यांच्यांत निःसीम, आदर्शभूत भक्तीची वाढ झालीच नसती. तात्पर्य असें कीं, आपल्या कल्पनेप्रमाणें आदर्श भक्ति भक्ताच्या मनांत निर्माण होण्यास उपास्य दैवताला सगुण साकार रूप असणें आवश्यक आहे, व तें रूप वेदकाळांत परिनिष्ठित झालें नव्हतें हेंहि एक वर परिच्छेद १५ च्या आरंभीं म्हटल्याप्रमाणें ऋग्वेदकालीन भक्तीच्या व नंतरच्या भक्तीच्या स्वरूपांतील महत्त्वाच्या भेदाचें कारण आहे.तथापि ऋग्वेदसूक्तांत प्रतिबिंबित झालेल्या इन्द्र व त्याचे स्तोते अथवा भक्त यांच्यामधील वर परि० १३-१४ यांत दाखविलेला देवभक्तसंबंध आणि अर्वाचीन संतशिरोमणि तुकाराम व पंढरीचा विठोबा यांच्यामधील अभंगांत प्रतीत होणारा देव-भक्त-संबंध यांच्यांत बरेंचसें साम्य आहे, हें इन्द्रसूक्तांच्या व अभंगाच्या स्थूल अभ्यासकाला देखील सहज कळून येण्यासारखें आहे. दोहोंत भेद असेल तर तपशिलाचा व कालभेदानें होणाऱ्या इतर गोष्टींचा. परंतु देवाजवळील भक्ताची सलगी, दोघांचें परस्पर जीवाभावाचें सख्य, भक्तासाठीं वाटेल तें रूप घेण्याची देवाची तयारी, आपल्याजवळ असेल नसेल तें दोन दोन

हातांनीं भक्तांना देण्याचें देवाचें औदार्य, भक्तांत मिसळून त्यांच्याबरोबर गाण्यानाचण्याची देखील हौस, 'न मे भक्तः प्रणश्यति' अशासारखी देवाची प्रतिज्ञा, भक्ताचें उच्छिष्ट देखील प्रेमानें सेवन करण्याची देवाची तयारी, भक्तांच्या स्तुतीची अखंड पिरपिर सोसण्याची देवाची दुर्दान्त हौस, भक्ताची अनन्यशरणागति व आत्मनिवेदन, वेळ पडल्यास देवाशीं वकिली लढवून आपला मुद्दा प्रस्थापित करण्याची भक्ताची हातोटी या सर्व गोष्टी ऋग्वेदसूक्तांत—विशेषतः इन्द्रसूक्तांत—त्याचप्रमाणें नामदेव, तुकाराम इत्यादि संतभक्तांच्या अभंगसूक्तींत सारख्याच आढळून येतात. फक्त ऋग्वेदांत प्रतीत होणारी भक्ति ही भोगी अथवा प्रवृत्तिमार्गी आहे; त्याच्यांत पदोपदीं ऐहिक भोगांबद्दलच्या आस्थेचा आविष्कार देव-भक्त-संबंधाच्या अनुषंगानें केलेला आढळतो. तर उलटपक्षीं संतमंडळीची भक्ति त्यागी अथवा निवृत्तिमार्गी आहे. ऐहिक-पारलौकिक सुखोपभोगां-बद्दलचा तीव्र निर्वेद हें तिचें अखंड अधिष्ठान आहे. देवतेच्या भक्तीनें प्रेमानंदावांचून संतभक्ताला दुसरें कांहींच मिळवावयाचें नसल्यानें संत-भक्तांची भक्ति वैदिक भक्ताच्या सख्य भक्तीपेक्षां निराळ्या परंतु निःस्वार्थी-पणामुळें अधिक उज्ज्वल अशा स्वरूपांत प्रतीत होते एवढेंच. तसेंच, संतभक्तांच्या वाङ्मयांत ठिकठिकाणीं विठोबाच्या अवयवांचें वर्णन, प्रत्यक्ष मूर्तीच्या दर्शनानें झालेला आनंद, व त्याच्या साकार स्वरूपाशीं आलेल्या संघर्षामुळें अनेक प्रकारचे धन्योद्गार इत्यादि गोष्टी आढळतात. परंतु इन्द्रादि देवतांच्या भक्तांच्या वचनांतून अशा गोष्टी बहुशः दिसतच नाहींत आणि त्याचें कारणहि वर सांगितल्याप्रमाणें प्रतिमापूजेचा अभाव हेंच आहे हें अत्यंत स्पष्ट आहे.

१८. ज्या प्रेमांत भक्त स्वतःचा लहानपणा व उपास्याचा मोठेपणा पूर्णपणें विसरून उपास्यदैवताशीं समरस होतो तें उच्च कोटीचें प्रेम, तीच परा अनुरक्ति व भक्ति व हेंच आमच्या कल्पनेप्रमाणें भक्तीचें खरें

उज्ज्वल स्वरूप. हीच भूमिका स्वीकारून मीं आपल्या व्याख्यानांतील प्रमेयांची उभारणी केली आहे. याच कारणानें मीं ऋग्वेदांतील इन्द्र-सूक्तांचाच परामर्श प्रामुख्यानें घेतला आहे. ऋग्वेदसूक्तांतील 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति' या सर्वत्र अनुस्यूत कल्पनेचा मीं पूर्वीं उल्लेख केलाच आहे; परंतु त्याचेचबरोबर प्रत्येक देवतेच्या म्हणून–म्हणजे परमेश्वराच्या त्या विशिष्ट स्वरूपाच्या विभूतीच्या म्हणून–कांहीं अनन्य-साधारण अशा गुणांची कल्पनाहि कवींनीं केलेली असते. या दृष्टीनें विचार केल्यास सर्व वैदिक देवतांमध्यें–अगर विभूतींमध्यें–इन्द्र हाच श्रेष्ठ आहे व श्रीकृष्णाप्रमाणेंच परमेश्वराचा पूर्णावतार आहे असें विचाराअंतीं दिसून येईल. आजपर्यंतची कल्पना म्हणजे वेदांतील सूक्तांमध्यें खऱ्या भक्तीचा आविष्कार नाहीं व थोडीफार भक्तीची छटा दिसत असेल तर ती वरुणसूक्तांतच आहे अशी आहे. ज्या विद्वानांनीं या मताचा प्रथम पुरस्कार केला त्यांची म्हणजे पाश्चात्य ख्रिस्तधर्मीय पंडितांची खऱ्या भक्तीची कल्पना आपल्या–म्हणजे प्राचीन भारतीयांच्या–भक्तीच्या कल्पनेपेक्षां तत्त्वतःच निराळी आहे. त्यांच्या मतें खरा भक्त म्हणजे तो कीं ज्याला परमेश्वराबद्दल विचार करतांना प्रत्येक वेळीं त्याचा मोठेपणा व आपला लहानपणा, त्याची दयाक्षमाशीलता व आपली पाप-प्रवणता, वगैरे देवभक्तांमधलें वैषम्य प्रामुख्यानें भासमान होतें. या सर्व गोष्टी वरुणसूक्तांतच स्पष्टपणानें आढळतात. म्हणून पाश्चात्य पंडितांच्या कल्पनेप्रमाणें वरुणसूक्तांतच खऱ्या भक्तीचें बीज सांपडतें. ऋग्वेदांत खुद्द वरुणाला गायिलेलीं अशीं सूक्तें फारच थोडीं आहेत. पहिल्या मण्डलांत २, दुसऱ्यांत १, पांचव्यांत १, सातव्यांत ४, आठव्यांत १ पुरें व एक अर्धें, अशीं एकंदर सरासरीं १० सूक्तें स्वतंत्र वरुणाच्या स्तुतिपर असलेलीं अशीं आहेत. याशिवाय इन्द्रावरुणा या जोडदेवतांना मिळून आणखी दहा सूक्तें आहेत. या दहांतहि एकट्या सातव्या मण्डलांतच ४

आहेत. मित्रावरुणा या जोडदेवतांनाहि अशींच आणखी १०।१५ सूक्तें गायिलेलीं आहेत. परंतु यांतील बहुतेक तुटक तुटक अशा ऋचा आहेत. यांतहि बऱ्याचशा सातव्या मण्डलांतीलच आहेत. एकंदरीनें पाहतां वरुणाची बरीचशी स्तुति वसिष्ठांनींच गायिलेली आहे, व हें योग्यच आहे. कारण वसिष्ठ ऋषि हा स्वतःला वरुणपुत्रच समजतो. तथापि वसिष्ठकुलांतील ऋषीहि वरुणाला फार भीत असत. त्यांनाहि वरुण कां रागावतो, त्याचा राग शांत कसा करावा हें कळत नाहीं. त्यांचीहि तारांबळ कशी उडत असे हें आपण वर परिच्छेद ६ (पृ. २१) वैदिक आर्यांना अनिष्ट असलेल्या गोष्टींच्या परीक्षणाचे वेळीं पाहिलेंच मध्यें आहे. त्यांची देखील जर ही कथा तर मग इतरांचें या दैवतापुढें काय होत असेल याची कल्पनाच करावी ! याचे मनांत काय असेल तें कळायचें नाहीं आणि स्वारी पहावी तेंव्हां क्रुद्ध ! बिचाऱ्या वसिष्ठांना मागच्या आठवणी येऊन विशेषच वाईट वाटे. तात्पर्य, कोणतेंहि वरुण-सूक्त घ्या, त्यांत कवीनें आपलें आगस् किंवा एनस् म्हणजे व्रतोल्लंघनाचा अपराध व वरुणाचा क्रोध, तिरस्कार आणि त्याबरोबरच त्याची क्षमा-शीलता, दयार्द्रता यांचा निर्देश केला नाहीं असें होणारच नाहीं. पुढील कांहीं उतारे पाहाः **कृतं चिदेनः प्रमुमुग्धि अस्मत्** ‘कांहीं अपराध केला असला तरीहि त्याला आमच्यापासून निखळून काढ’ (१.२४.९); **अहेळमानो वरुणेह बोधि** ‘आतां आमचा तिरस्कार न करतां इकडे ये’ (१.२४.११); **यच्चिद्धि ते विशो यथा प्र देव वरुण व्रतं मिनीमसि द्यविद्यवि** ‘आम्हीं साधीं माणसेंच आहोंत म्हणून जो कांहीं आम्ही तुझ्या व्रताचा रोजच्या रोज भंग केला असेल’ (१.२५.१); **श्रुधी हवमद्या च मृळय** ‘आमची ही हाक ऐक व आज आमच्यावर दया कर’ (१.२५.१९). **वि मच्छ्रथाय रशनामिवागः** ‘हा माझा अपराध दोरखंडाच्या बंदाप्रमाणें माझ्यापासून दूर कर—सैल

कर' (२.२८.५); **यत्सीमागश्चकृमा शिश्रथस्तत्** 'जो जो कांहीं अपराध आम्हीं केला असेल तो तो तूं आमच्यापासून दूर कर' (५.८५.७); **समानमिन्मे कवयश्चिदाहुः अयं ह तुभ्यं वरुणो हृणीते** 'कवी देखील मला ती एकच गोष्ट सांगतात कीं वरुण हा तुझ्यावर रागावला आहे' (७.८६.३); **यो मृळयाति चक्रुषे चिदागः** 'प्रत्यक्ष अपराध करणाऱ्यावर देखील जो दया करतो' (७.८७.७); **य आपिर्नित्यो वरुण प्रियः सन् त्वामागांसि कृणवत् सखा ते** 'ज्या तुझ्या आवडत्या विश्वासू नातलगानें तुझे अपराध केले आहेत तो तुझा सखाच आहे बरें' (७.८८.६); **अचित्ती यत्तव धर्मा युयोपिम मा नस्तस्मादेनसो देव रीरिषः** 'अज्ञानानें (प्रणयानें नव्हे बरें का! या आग्या वेताळाजवळ प्रणय कोण करणार!) ज्या आम्हीं तुझ्या व्रतांचा–नियमांचा भंग केला त्या अपराधामुळें आमचा नाश करूं नकोस देवा!' (७.८९.५). याखेरीज वरुणाच्या मोठेपणाचे म्हणजे जगाच्या धारण-पोषणासंबंधींचेहि उल्लेख वरुणसूक्तांत नेहमीं येतात; परंतु स्तोत्याच्या लडिवाळपणाचें, मोकळेपणाचें त्यांत नांवहि नसतें. इथून तिथून आपल्याला ठाऊकहि नसलेल्या पण देवाच्या नजरेंतून न सुटलेल्या एखाद्या अपराधाच्या चिंतेनें ग्रस्त होऊन कवि देवाच्या दयेची भीक मागत मागत भिऊन जाऊन कसा तरी त्याच्या हातून निसटूं पाहात आहे, अशी सूक्तवाचकांची कल्पना होते. इन्द्राकडे पाहण्याची कवीची दृष्टि व वरुणाकडे पाहण्याची त्याची दृष्टि यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. वरुणाबद्दल कवीच्या मनांत आदर आहे, भीति आहे, परंतु प्रेमाचा, अनुरक्तीचा, लडिवाळपणाचा एक थेंबहि आहे असें वाटत नाहीं. इन्द्रावरुणा या जोडदेवतेची प्रार्थना बहुधा प्रतिस्पर्ध्यांशीं सामन्याच्या वेळीं कवी करतात. इन्द्र हा सामर्थ्याचा दाता परंतु भक्तामध्यें आगस्–एनस्–अनृत वगैरे असेल तर त्याच्या पदरीं अपयशच येतें; म्हणून तें दूर करून

इन्द्रदत्त सामर्थ्याच्या प्रभावास वाव करून देणें याची अपेक्षा वरुणाकडून असते याचा निर्देश वर परिच्छेद ६ च्या अखेरीस (पृ. २४) प्राचीन आर्यांच्या अनिष्ट गोष्टींचें विवरण करतांना केला आहे. इन्द्रावरुणांचें जोड-वर्णन करतांना प्रत्येकाचें वैशिष्ट्य कवि कसें सांगतो हें पाहण्यासारखें आहे. **कृष्टीरन्यो धारयति प्रविक्ताः वृत्राण्यन्यो अप्रतीनि हन्ति** ‘यांतील एक लोकांना आपपल्या मर्यादेंत राहण्यास भाग पाडतो तर दुसरा निस्तुल अशा शत्रूंचें निर्दालन करतो’ (७.८५.३). **परि नो हेळो वरुणस्य वृज्याः उरुं न इन्द्रः कृणवदु लोकं** ‘वरुणाचा तिरस्कार आमच्याकडे न वळो आणि इन्द्र आम्हांला विस्तीर्ण प्रदेश प्राप्त करून देवो’ (७.८४.२). **प्र य आदित्यो अनृता मिनाति अमिता शूरो दयते वसूनि** ‘जो आदित्य म्हणजे वरुण आमचे अपराध छाटून टाकतो; व तो शूर देव म्हणजे इंद्र अमित धनें देतो’ (७-८४.४). **वृत्राण्यन्यः समिथेषु जिघ्नते व्रतान्यन्यो अभि रक्षते सदा** ‘या जोडींतील एक जण युद्धांतून शत्रूंना ठार करतो तर दुसरा आपल्या नियमांचें केव्हांच उल्लंघन होऊं देत नाहीं’ (७.८३.९). तात्पर्य, वरुणाबद्दल कवीच्या मनांत नेहमींच भीतियुक्त आदर वसत असतो, त्याच्या मोठेपणाचा व आपल्या अपराधशीलत्वाचा त्याला कधींहि विसर पडत नाहीं आणि म्हणून आम्हां भारतीय आर्यांच्या कल्पनेंतील परमोच्च भक्तीचा प्रादुर्भाव व विकास त्या म्हणजे वरुणदेवतेच्या भक्तांच्या मनांत होऊं शकला नाहीं. जो कांहीं प्रादुर्भाव व विकास झाला तो इन्द्रभक्तांच्या मनांतच झाला. ऋक्सूक्तांत प्रामुख्यानें चमकणारी तिसरी देवता म्हणजे अग्नि हिच्याबद्दलहि भक्तांच्या मनांत इन्द्राप्रमाणेंच प्रेमळपणा, आपलेपणा वगैरे आढळतो. तथापि ही देवता आधिभौतिक स्वरूपांतहि कवीच्या नित्य परिचयाची असल्यामुळें तिच्या देवत्वाला थोडें गौणत्व आलेलें आहे. परंतु जेव्हां जेव्हां आधिदैविक स्वरूपांत अग्नि भक्तांच्या मनश्चक्षूंपुढें उभा राहतो त्या

त्या वेळीं त्या दैवताबद्दलहि कवीच्या मनांत प्रेमभाव उत्पन्न होतो व या प्रेमभावाचें स्वरूप इन्द्रावरील प्रेमभावाच्या जातीचेंच आहे असें अग्निसूक्तांच्या वाचनानें लक्षांत येतें. हाच प्रकार सोम, सूर्य, उषा वगैरे देवतांच्या बाबतींत आढळतो. अश्विना या जुळ्या देवांची तऱ्हा थोडी निराळी आहे. यांचें देवत्व इन्द्र, अग्नि व वरुण यांच्या देवत्वाहून जरा खालच्या कोटींतील आहे. तथापि यांच्याबरोबरहि वैदिक भक्त अतिशय मोकळेपणानें वागतो, व त्यांच्याबद्दल त्यांना भीति वाटत नाहीं. माझ्या व्याख्यानांत मीं फक्त इन्द्राचाच परामर्श घेतलेला आहे, व इन्द्राविषयींच्या वैदिक कवींच्या भावनेला मीं भक्ति हें नांव देऊन हीच आम्हां भारतीयांची वेदकालीन स्वरूपांत दृग्गोचर होणारी शुद्ध भक्ति आहे असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. भारतीयांची शुद्ध भक्ति म्हणजे प्रथम श्रीभगवद्गीतेंत पूर्णांशानें प्रकट झालेली व नंतर, महाराष्ट्रापुरतेंच बोलावयाचें झाल्यास, संतशिरोमणि तुकारामाच्या कवितेंत पदोपदीं आढळणारी भक्ति हें मी गृहीत धरून चाललों आहें हें निराळें सांगावयास नकोच. वरुणाबद्दलची वैदिक कवींची भावना ही भीतिग्रस्त असल्यामुळें भारतीयांच्या परिचयाची शुद्ध भक्ति ही नव्हे असेंहि मीं दाखविण्याचा यत्न केला आहे. ज्या भक्तीच्या योगानें 'पैं सर्वभावेंसी उखितें । जे वोपिले मज चित्तें । जैसा गर्भगोळु उद्यमातें । कांहींच नेणें ॥९.३३५॥ तैसा मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटेंचि नाहीं । मजचि नाम पाहीं । जिणेया ठेविलें ॥३३६॥ ऐसें अनन्य गतिकें चित्तें । चिंतित सांने मातें । जे उपासिती तयांतें । मीचि सेवीं ॥३३७॥' किंवा 'पैं गा भक्तासि माझें कोड । मज तयाचे अनन्य गतीची चाड । कां जें प्रेमळाचें सांकड । आमुचिया घरीं ॥१०.१३७॥' अशी देवभक्तांची परस्पर स्थिति होते, किंवा जिच्या योगानें भक्ताची अशी खात्री होते कीं,

**सरलें, आतां नाहीं । न म्हणे वेळ काळ कांहीं ।**
**विठ्ठल कृपाळू माउली । सदा प्रेमें पान्हायेली ।**
**सीण विचारी भाग । नव्हे निष्ठुर नाहीं राग ।**
**भेदाभेद नाहीं । तुका म्हणे तिच्या ठाईं ॥** अभंग २६७२

तीच आमच्या परिचयाची शुद्ध भक्ति.

या शुद्ध भक्तीचीं बहुतेक सर्व प्रमुख लक्षणें वर परिच्छेद १७ मध्यें दाखविल्याप्रमाणें इन्द्रसूक्तांतहि स्पष्टपणें दिसून येतात. या दोन्ही कालच्या म्हणजे ऋग्वेदकालच्या व वेदोत्तरकालच्या भक्तींत भक्तीचा जो विशिष्ट गुण अर्थात् ज्यांत अत्यादर व भीति नाहीं असा प्रेमाचा उत्कटपणा तो बहुधा सारख्याच रीतीनें प्रकट होतो. वेदकालीन भक्तींत आढळणारी भोगलोलुपता ही देखील क्रमाक्रमानेंच नाहींशी होऊन ईश्वराच्या प्रेमाव्यतिरिक्त अधिक आनंददायक स्वार्थ भक्ताला न आढळल्यामुळें हें प्रेम, ही भक्तीच भक्ताचा स्वार्थ व परमपुरुषार्थ होऊन बसली. थोडक्यांत म्हणजे ऋग्वेदाच्या इन्द्रसूक्तांत प्रथम प्रकट झालेली ही आदरभीतिरहित उत्कट प्रेमरूप भक्ति जरी तत्कालीन भक्ताच्या ऐहिक जीवनावरील आस्थेमुळें वेदांत उज्ज्वल स्वरूपांत प्रतीत होत नसली तरी भक्ताच्या परमपुरुषार्थाबद्दलच्या कल्पतेंत कालान्तरानें बदल घडून आल्यावर म्हणजे वेदोत्तरकालीं ती भक्ति स्वतःच वर म्हटल्याप्रमाणें ध्येयरूप झाल्यावर महाराष्ट्रीय संतवाङ्मयांत तीच भक्ति आपल्या श्रेष्ठ स्वरूपांत चमकूं लागली हें या सर्व निबंधाचें तात्पर्य. शेवटीं ज्या प्रभूच्या प्रेरणेनें आपण माझ्याकडून ही सेवा करवून घेतली त्याच्या चरणावर हे माझे वेडेवाकडे बोल भक्तिभावानें अर्पण करून, शिक्षण-प्रसारक मंडळीचे अध्यक्ष व सभासद यांचे तसेंच आपणां सर्वांचे आभार मानून मी माझें हें लांबलेलें व्याख्यान—हें माझें **इन्द्रायण**—पूर्ण करतों.

**सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु । मा विद्विषावहै ॥ शान्तिः । शान्तिः । शान्तिः ।**

## भाषान्तरित उताऱ्यांची सूची

# ऋग्वेदसंहिता

### मंडल पहिलें



### मंडल २ रें

### मंडल ३ रें



### मंडल ४ थें



### मंडल ५ वें



### मंडल ६ वें



### मंडल ७ वें

---